॥ ॐ श्रीपरमात्मने नमः॥

# अथ षोडशोऽध्यायः

## अवतरणिका

श्रीभगवंतांनी सातव्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात "**दुष्कृतिनो मूढाः आसुरं भावमाश्रिताः मां न प्रपद्यन्ते**" (वाईट कर्म करणारे तसेच आसुरी प्रकृती धारण करणारी मूढ माणसे माझे भजन करीत नाहीत) पदांनी आसुरी संपत्ती असलेल्यांचे आणि सोळाव्या श्लोकात "**सुकृतिनः मां भजन्ते**" (पुण्यकर्तेलोक माझे भजन करतात) पदांनी दैवी संपत्ती असणाऱ्यांचे संकेतरूपाने वर्णन केले. सातव्या अध्यायाच्या अन्तिम दोन श्लोकांवर अर्जुनाने आठव्या अध्यायाच्या आरंभी सात प्रश्न केले. त्या प्रश्नाच्या उत्तरात आठवा अध्याय पूर्ण झाला.

भगवंतांनी सातव्या अध्यायाच्या आरंभी जे विज्ञानासह ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा केली होती, तेच विज्ञानासह-ज्ञान सांगण्यासाठी नवव्या अध्यायाचा विषय आरंभ केला. या नवव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकातही "**राक्षसी-मासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः**" पदांनी आसुरी सम्पदा असणाऱ्यांचे आणि तेराव्या श्लोकात "**दैवीं प्रकृतिमाश्रिताः मां भजन्ते**" पदांनी दैवी सम्पदा असणाऱ्यांचे संक्षेपाने वर्णन करून दहाव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापर्यंत ज्ञान-विज्ञानाचा विषय सांगितला.

दहाव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकानंतर भगवंतांनी दैवी-आसुरी संपत्तीचे विस्ताराने वर्णन करावयाला पाहिजे होते, परंतु भगवंताच्या प्रभावाने प्रभावित होऊन अर्जुनाने भगवंताची स्तुती केली आणि पुन्हा विभूती सांगण्याची विनंती केली. विभूतींचे वर्णन करताना भगवंतांनी दहाव्या अध्यायाच्या अंतिम श्लोकात अर्जुनाला म्हटले की "तुला अधिक जाणण्यात काय मतलब? मी तर संपूर्ण संसार एका अंशात व्याप्त करून स्थित आहे". यावर त्या स्वरूपाला (ज्याच्या एका अंशात संपूर्ण संसार स्थित आहे) पाहण्यासाठी उत्सुक झालेल्या अर्जुनाने अकराव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांना विश्वरूप दाखविण्याची प्रार्थना केली.

अर्जुनाला आपले विश्वरूप दाखवून भगवंतांनी अकराव्या अध्यायाच्या चोपन्नाव्या-पचावन्नाव्या श्लोकात अनन्यभक्तीचा महिमा तसेच त्याचे स्वरूप सांगितले. त्यावर सगुण आणि निर्गुण उपासकांच्या श्रेष्ठतेच्या विषयात अर्जुनाने बाराव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात प्रश्न केला. म्हणून भगवंतांनी बाराव्या अध्यायात सगुण उपासकांचे वर्णन करून तेराव्या अध्यायापासून चौदाव्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकापर्यंत निर्गुण विषयाचे वर्णन केले. त्यानंतर अर्जुनाने चौदाव्या अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात गुणातीताचे लक्षण, आचरण तसेच गुणातीत होण्याचा उपाय विचारला. त्या प्रश्नाचे उत्तर देताना भगवंतांनी सव्वीसाव्या श्लोकात "**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते**" पदांनी अव्यभिचारिणी भक्ती हा गुणातीत होण्याचा उपाय सांगितला. अर्थात् अव्यभिचाराने दैवी संम्पत्तीचा आणि व्यभिचाराने आसुरी संपत्तीचा संकेत केला. ती अव्यभिचारी भक्ती कशी प्राप्त होईल? हे सांगण्यासाठी पंधरावा अध्याय आरंभ झाला.

पंधराव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी "**असङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा**" पदांनी आसुरी संपत्तीचे कारणरूप "सङ्ग" (संसाराची आसक्ती) याचा त्याग करून असंगतेने प्रकट होणाऱ्या दैवी संपत्तीची गोष्ट सांगितली. मग चौथ्या श्लोकात "**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये**" पदांनी शरणागतिरूपी दैवी संपत्तीचे वर्णन केले आणि अर्थान्तरात जे शरण होत नाहीत, त्या आसुरी संपत्ती असणाऱ्यांचा संकेत केला. त्यानंतर एकोणीसाव्या श्लोकात "**स सर्वविद् असम्मूढः मां सर्वभावेन भजति**" पदांनी दैवी संपत्ती असणाऱ्यांचे अर्थात् अधिकाऱ्यांचे वर्णन केले आणि अर्थान्तरात जे भगवंताचे भजन करीत नाहीत त्या आसुरी सम्पदा असणाऱ्यांचे अर्थात् अनधिकाऱ्यांचे वर्णन केले.

अशा प्रकारे अर्जुनाच्या अन्य प्रश्नामुळे आत्तापर्यंत भगवंतांना दैवी आणि आसुरी संपत्तीवर विस्ताराने सांगण्याचा अवसरच प्राप्त झाला नाही. आता अर्जुनाचा कोणताच प्रश्न नसल्यामुळे भगवान् या सोळाव्या अध्यायात दैवी आणि आसुरी संपत्तीचे विस्ताराने वर्णन आरंभ करीत आहेत.

श्रीभगवानुवाच

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्॥ १॥**

श्रीभगवान् म्हणाले—

**अभयम्** = भयाचा संपूर्णपणे अभाव, **सत्त्वसंशुद्धि** = अंत:करणाची अत्यंत शुद्धी, **ज्ञानयोग-** = ज्ञानासाठी योगात **व्यवस्थितिः** दृढ स्थिती, **च** = आणि **दानम्** = सात्त्विक दान, **दमः** = इंद्रियांचे दमन, **यज्ञः** = यज्ञ, **स्वाध्यायः** = स्वाध्याय, **तपः** = कर्तव्य, पालनासाठी कष्ट सहन करणे **च** = आणि **आर्वजम्** = शरीर-मन-वाणीची सरळता.

*व्याख्या*—[पंधराव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले की, "जो मला पुरुषोत्तम जाणतो, तो सर्व प्रकारे माझेच भजन करतो अर्थात् तो माझा अनन्य भक्त होतो." अशा प्रकारे केवळ भगवंताचा उद्देश असल्याने साधकामध्ये आपोआप दैवी संपत्ती प्रगट होऊ लागते. म्हणून भगवान् पहिल्या तीन श्लोकात क्रमाने भाव, आचरण आणि प्रभाव यांच्या अनुषंगाने दैवी संपत्तीचे वर्णन करतात.]

**अभयम्**— *अनिष्टाच्या शंकेने मनुष्यात जी घबराट होते, त्याचे नाव भय आणि त्या भयाचा सर्वथा अभाव असणे याला "अभय" म्हणतात.

भय दोन प्रकाराने होते (१) बाहेरुन होणारे भय (२) आतून होणारे भय.

**(१) बाहेरुन होणारे भय**—(क) चोर, डाकू, वाघ, सर्प इत्यादी प्राण्यांपासून जे भय होते, ते बाहेरुन होणारे भय आहे. हे भय शरीराचा नाश होण्याच्या शंकेने होत असते. परंतु जेव्हा हा अनुभव होतो की, हे शरीर नाशवान् आहे आणि जाणारेच आहे, तर मग भय राहत नाही.

बिडी, सिगरेट, अफू, भांग, दारू इत्यादी व्यसने सोडण्याचे तसेच व्यसनी मित्रांची मित्रता तुटण्याचे जे भय असते, ते मनुष्याच्या स्वत:च्या भित्रेपणानेच होत असते. भित्रेपणा सोडल्यास हे भय राहत नाही.

(ख) आपल्या वर्णाश्रमादीनुसार कर्तव्य पालन करीत असताना त्यात भगवंताच्या आज्ञेविरुद्ध कोणतेही काम होऊ नये, आपणाला विद्या शिकविणारे, उत्तम शिक्षण देणारे आचार्य, गुरू, संत-महात्मा, माता-पिता यांच्या वचनांची, आज्ञेची अवहेलना होऊ नये, आपल्याकडून शास्त्र आणि कुलमर्यादेविरुद्ध कोणतेही आचरण होऊ नये. अशा प्रकारचे भयही बाहेरुन होणारे भय म्हटले जाते. परंतु हे भय वास्तविक भय नाही, उलट हे तर अभय करणारे भय आहे. असे भय तर साधकाच्या जीवनामध्ये असलेच पाहिजे. असे भय राहिल्यानेच तो आपल्या मार्गावर योग्य रीतीने मार्गक्रमण करू शकतो. म्हटलेही आहे—

**हरि-डर, गुरु-डर, जगत-डर, डर करनी मे सार।**
**रज्जब डर्‌या सो उबर्‌या, गाफिल खायी मार॥**

**(२) आतून उत्पन्न होणारे भय**—(क) मनुष्य जेव्हा पाप, अन्याय, अत्याचार इत्यादी निषिद्ध आचरण करू इच्छितो, तेव्हा (ते करण्याची मनात भावना येताच) आतून भय उत्पन्न होते. जोपर्यंत मनुष्याच्या मनात माझे शरीर स्वस्थ रहावे, माझा मान-सन्मान होत रहावा, मला सांसारिक भोगपदार्थ मिळत रहावे, अशा प्रकारे सांसारिक जड पदार्थांच्या प्राप्तीचा आणि त्यांच्या रक्षणाचा उद्देश राहतो, तोपर्यंतच मनुष्य निषिद्ध आचरण करतो.† परंतु

* येथे दैवी संपत्तीमध्ये सर्वात प्रथम "अभयम्" पद देण्याचे तात्पर्य असे आहे की, जो भगवंतांना शरण जाऊन सर्व भावाने भगवंताचे भजन करतो, तो सर्वत्र अभय होतो. भगवान् श्रीराम म्हणतात—

सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते। अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद् व्रतं मम॥

(वाल्मिकी॰ ६। १८। ३३)

† भोगे रोगभयं कुले च्युतिभयं वित्ते नृपालाद् भयं माने दैन्यभयं बले रिपुभयं रूपे जराया भयम्। शास्त्रे वादभयं गुणे खलभयं काये कृतान्ताद् भयं सर्वं वस्तु भयावहं भुवि नृणां वैराग्यमेवाभयम्॥ (भर्तृहरिवैराग्यशतक)

"भोगामध्ये रोगाचे भय, उच्चकुलात भ्रष्ट होण्याचे भय, धनामध्ये राजाचे भय, मानामध्ये दीनतेचे भय, बलात शत्रूचे भय, रूपात म्हातारपणाचे भय, शास्त्रात वाद विवादाचे भय, गुणात दुर्जनाचे भय आणि शरीरात मृत्यूचे भय आहे. अशा प्रकारे संसारात मनुष्याला संपूर्ण वस्तू भयावह आहेत, एक वैराग्यच भयरहित आहे." तात्पर्य ह्या सांसारिक वस्तू नष्ट तर होणार नाहीत? याचे मनुष्याला सदा भय राहते. म्हणून तो अभय होऊ शकत नाही.

जेव्हा मनुष्याचा केवळ चिन्मय तत्त्वालाच प्राप्त करण्याचा उद्देश असतो.* तेव्हा त्याच्याकडून अन्याय, दुराचार होत नाही आणि तो सर्वथा अभय होतो. कारण त्याचे लक्ष्य असलेले परमात्मतत्त्व ह्यात कधीही कोणतीही उणीव येत नाही आणि ते कधीही नष्ट होत नाही.

(ख) जेव्हा मनुष्याचे आचरण योग्य होत नाही आणि तो अन्याय, अत्याचार इत्यादी करीत राहतो तेव्हा त्याला भय वाटते. जसे रावणाला मनुष्य, देवता, यक्ष, राक्षस इत्यादी सर्व भीत होते, परंतु तोच रावण जेव्हा सीता हरणासाठी जातो, तेव्हा तो भितो. त्याचप्रमाणे कौरवांच्या अकरा अक्षौहिणी सैन्यांची वाद्ये वाजू लागली तेव्हा त्याचा पांडव सैन्यावर काहीच परिणाम झाला नाही. (१।१३), परंतु जेव्हा पांडवांच्या सात अक्षौहिणी सैन्यांची वाद्ये वाजली तेव्हा कौरव सैन्याचे हृदय विदीर्ण झाले. (१।१९) तात्पर्य अन्याय, अत्याचार करणाऱ्यांचे हृदय कमजोर होते, म्हणून ते भयभीत होतात. जेव्हा मनुष्य अन्याय, इत्यादींचा त्याग करून आपल्या आचरणाला आणि भावांना शुद्ध करतो तेव्हा त्याचे भय समाप्त होते.

(ग) मनुष्यशरीर प्राप्त करून हा जीव जोपर्यंत करण्यायोग्य कार्य करीत नाही, जाणण्यायोग्य जाणत नाही, प्राप्तकरण्यायोग्य प्राप्त करीत नाही, तोपर्यंत तो सर्वथा अभय होऊ शकत नाही. त्याच्या जीवनात भय राहतच असते.

भगवंताकडे अग्रेसर होणारा साधक भगवंतावर जितका जितका अधिक विश्वास करतो आणि त्यांच्या आश्रित होतो. तितका तितकाच तो अभय होत जातो. त्याला आपोआप असा विचार येतो की, मी तर परमात्म्याचा अंश आहे, म्हणून कधी नष्ट होणारा नाही, तर मग भय कशाचे?‡ आणि संसाराचे अंश शरीर इत्यादी सर्व पदार्थ प्रतिक्षण नष्ट होत आहेत, तर मग भय कशाचे? असा विवेक स्पष्टपणे जागृत झाल्यावर भय आपोआप नष्ट होते आणि साधक सर्वथा अभय होतो.

भगवंताशी संबंध जोडल्यावर, भगवंतालाच आपले मानल्यावर शरीर, कुटुंब, इत्यादीविषयी ममता राहत नाही. ममता न राहण्याने मरण्याचे भय राहत नाही आणि साधक अभय होतो.

**सत्त्वसंशुद्धिः**—अंत:करणाच्या सम्यक् शुद्धीला सत्त्वसंशुद्धी म्हणतात. सम्यक् शुद्धी काय आहे? संसाराशी आसक्तिरहित होऊन भगवंतात अनुराग होणे हीच अंत:-करणाची सम्यक् शुद्धी आहे. जेव्हा आपला विचार, भाव, उद्देश, लक्ष्य केवळ एक परमात्मप्राप्ती हेच होते, तेव्हा अंत:-करण शुद्ध होते. कारण नाशवान् वस्तूंच्या प्राप्तीचा उद्देश असल्यानेच अंत:करणात मल, विक्षेप आणि आवरण—हे तीन प्रकारचे दोष येतात. शास्त्रामध्ये मल दोष दूर करण्यासाठी निष्कामभावनेने कर्म (सेवा), विक्षेप दूर करण्यासाठी उपासना आणि आवरण दोष दूर करण्यासाठी ज्ञान सांगितले आहे. असे असले तरी अंत:करणाच्या शुद्धीसाठी सर्वात श्रेष्ठ उपाय, अंत:करणाला आपले न मानणे, हा आहे.

साधकाने जुने पाप दूर करण्यासाठी अथवा एखाद्या परिस्थितीला वश होऊन केल्या गेलेल्या नवीन पापाला दूर करण्यासाठी अन्य प्रायश्चित्त करण्याची तितकी आवश्यकता नाही. तो जे साधन करीत आहे, त्यातच त्याने उत्साह आणि तत्परतेने लागून राहिले पाहिजे मग त्याची ज्ञात अज्ञात सर्व पापे समाप्त होतील आणि अंत:करण आपोआप शुद्ध होईल.

साधकाची अशी एक भावना तयार होते की, साधन भजन करणे वेगळे काम आहे आणि व्यापार धंदा इत्यादी करणे वेगळे काम आहे. अर्थात् हे दोन्ही वेगवेगळे विभाग आहेत. म्हणून व्यापार इत्यादी व्यवहारात असत्य-कपट इत्यादी तर करावेच लागते. अशी जी सूट घेतली जाते त्यामुळे अंत:करण फारच अशुद्ध होते. साधनेबरोबर जे असाधन होत राहते, त्यामुळे साधनेत लवकर उन्नती होत नाही. म्हणून साधकाने नेहमी सावधान राहिले पाहिजे अर्थात् नवीन पाप होणार नाही अशी दक्षता नेहमी ठेवली पाहिजे.

साधक चुकून केलेल्या दुष्कर्मानुसार आपल्याला दोषी मानून घेतो आणि आपले वाईट करणाऱ्या व्यक्तीलाही दोषी मानतो, ज्यामुळे त्याचे अंत:करण अशुद्ध होते. त्या अशुद्धीला नाहीसे करण्यासाठी साधकाने चुकून केलेल्या दुष्कर्मांना पुन: कधी न करण्याचे दृढ व्रत घ्यावे तसेच आपले वाईट करणाऱ्या व्यक्तीच्या अपराधांना त्याने न मागताच; क्षमा करावी आणि भगवंताना प्रार्थना करावी की, ''हे नाथ! माझे जे काही वाईट झाले आहे, ते तर माझ्या दुष्कर्माचेच फल आहे. तो बिचारा तर विनाकारण असे करून बसला. त्याचा यात काहीही दोष नाही. आपण त्याला क्षमा करावी.'' असे केल्याने अंत:करण शुद्ध होते.

* उद्देश तर अगोदरच निश्चित झालेला असतो. त्यानंतर आपल्याला मनुष्यशरीर मिळाले आहे. म्हणून उद्देशाला केवळ ओळखायचे आहे. बनवायचे नाही.

‡ राम मरे तो मैं मरूँ नहिं तो मरे बलाय। अविनाशी का बालका, मरे न मारा जाय॥

**ज्ञानयोगव्यवस्थितिः**—ज्ञानासाठी योगात स्थित होणे अर्थात् परमात्मतत्त्वाचे जे ज्ञान (बोध) आहे, मग ते सगुणाचे असो की निर्गुणाचे असो, त्या ज्ञानासाठी योगात स्थित होणे आवश्यक आहे. योगाचा अर्थ आहे—सांसारिक पदार्थांच्या प्राप्ती-अप्राप्तीत, मान-अपमानात, निंदा-स्तुतीत, रोग-निरोगता ह्यात सम राहणे अर्थात् अंतःकरणात हर्ष-शोकादी विकार न होता निर्विकार राहणे.

**दानम्**—लोकदृष्टीने ज्या वस्तूंना आपले मानले जाते, त्या वस्तूंना सत्पात्राचा तसेच देश, काळ, परिस्थिती, इत्यादीचा विचार करून आवश्यकतेनुसार दुसऱ्यांना वितीर्ण करणे ''दान'' आहे. दाने अनेक प्रकारची असतात. जसे भूमीदान, गोदान, स्वर्णदान, अन्नदान, वस्त्रदान इत्यादी. या सर्वात अन्नदान प्रधान आहे. परंतु यापेक्षाही अभयदान प्रधान (श्रेष्ठ) आहे* त्या अभयदानाचे दोन प्रकार आहेत—

(१) संसारातील संकटे, विघ्ने, परिस्थिती यांनी भयभीत झालेल्यास आपल्या शक्ती, सामर्थ्यानुसार भयरहित करणे, त्याला आश्वासन देणे, त्याची साहाय्यता करणे, हे अभयदान त्याच्या शरीरादी सांसारिक पदार्थाला अनुसरून असते.

(२) संसारात फसलेल्यास जन्म-मरणरहित करण्यासाठी भगवंताची कथा इत्यादी ऐकविणे,† गीता, रामायण, भागवत इत्यादी ग्रंथांना तसेच त्यांच्या भावांना सरळ भाषेत छापून स्वस्त किंमतीत लोकांना देणे अथवा कोणी समजून घेऊ इच्छित असेल तर त्याला समजावणे, ज्यामुळे त्याचे कल्याण व्हावे. अशा दानाने भगवान् फार प्रसन्न होतात (१८। ६८-६९). कारण भगवंतच सर्वात परिपूर्ण आहेत. म्हणून जितक्या अधिक जीवांचे कल्याण होते तितकेच भगवान् प्रसन्न होतात. हे सर्वश्रेष्ठ अभयदान आहे. यातही दुसऱ्याशी भगवत्संबंधी चर्चा करताना साधक वक्त्याने ही दक्षता घेतली पाहिजे की, त्याने दुसऱ्यापेक्षा आपल्यात विशेषता मानू नये, उलट यात भगवंताचीच कृपा मानावी की, भगवंतच श्रोत्याच्या रूपात येऊन माझा वेळ सार्थक करीत आहेत.

वर जितकी दाने सांगितली आहेत त्यांच्याशी आपला संबंध न जोडता साधकाने असे मानावे की, आपल्याजवळ वस्तू, सामर्थ्य, योग्यता इत्यादी जे काही आहे ते सर्व भगवंतांनी दुसऱ्यांची सेवा करण्यासाठी मला निमित्त करून दिले आहे. म्हणून भगवत्प्रीत्यर्थ आवश्यकतेनुसार ज्याला जे दिले जाईल ते सर्व त्याचेच समजून त्याला देणे ''दान'' आहे.

**दमः**—इंद्रियांना पूर्णपणे वश करण्याचे नाव ''दम'' आहे. तात्पर्य इंद्रिये, अंतःकरण आणि शरीराकडून कोणतीही प्रवृत्ती शास्त्रनिषिद्ध होता कामा नये. शास्त्रविहित प्रवृत्ती सुद्धा आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच झाली पाहिजे. अशा प्रकारच्या प्रवृत्तीने इंद्रिय लोलुपता, आसक्ती आणि पराधीनता राहत नाही तसेच शरीर आणि इंद्रियांचे आचरण, शुद्ध, निर्मळ होते.

साधकाचा उद्देश इंद्रियांच्या दमनाचा असल्याने अकर्तव्यात तर प्रवृत्ती होतच नाही आणि कर्तव्यात स्वाभाविक प्रवृत्ती होते, तर त्यात स्वार्थ, अभिमान, आसक्ती, कामना इत्यादी दोष राहत नाहीत. जरी एखाद्या कार्यात कधी स्वार्थ आला तरी तो त्याचे दमन करीत राहतो त्यामुळे अशुद्धी नाहीशी होते आणि शुद्धी होत राहते व कालान्तराने त्याचा दम अर्थात् इंद्रिय-संयम सिद्ध होतो.

**यज्ञः**—''**यज्ञ**'' शब्दाचा अर्थ आहुती देणे असा होतो. म्हणून आपल्या वर्णाश्रमानुसार होम, बलिवैश्वदेव, इत्यादी करणे ''यज्ञ'' आहे. याशिवाय गीतेच्या दृष्टीने आपल्या वर्ण, आश्रम, परिस्थिती इत्यादीनुसार ज्यावेळी जे कर्तव्य प्राप्त होईल, ते स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून दुसऱ्यांच्या हिताच्या भावनेने अथवा भगवत्प्रीत्यर्थ करणे ''यज्ञ'' आहे. या व्यतिरिक्त जीविकासंबंधी व्यापार, शेती इत्यादी तसेच शरीरनिर्वाहसंबंधी खाणे-पिणे, चालणे-फिरणे, झोपणे-जागणे, देणे-घेणे इत्यादी सर्व क्रिया भगवत्प्रीत्यर्थ करणे ''यज्ञ'' आहे. तसेच माता-पिता, आचार्य, गुरुजन इत्यादींच्या आज्ञेचे पालन करणे, त्यांची सेवा करणे, त्यांना मन, वाणी, शरीर आणि धनाने सुख देऊन त्यांची प्रसन्नता प्राप्त करणे आणि गाय, ब्राह्मण, देवता, परमात्मा इत्यादींचे पूजन करणे, सत्कार करणे—हे सर्व ''यज्ञ'' आहेत.

**स्वाध्यायः**—आपल्या ध्येयाच्या सिद्धीसाठी भगवन्नामाचा जप आणि गीता, भागवत, रामायण, महाभारत इत्यादींच्या पठन-पाठनाचे नाव ''स्वाध्याय'' आहे. वास्तविक तर ''**स्वस्य**

---

* न गोप्रदानं न महीप्रदानं न चान्नदानं हि तथा प्रधानम्। यथा वदन्तीह बुधाः प्रधानं सर्वप्रदानेष्वभयप्रदानम्॥ (पंचतंत्र मित्रभेद ३१३)
गोदान, भूमीदान आणि अन्नदान ही अभयदाना इतके महत्त्वपूर्ण नाहीत विद्वानलोक अभयदानाला सर्व दानात श्रेष्ठ मानतात.

† तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम्। श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः॥ (श्रीमद्भा० १०। ३१। ९)
हे प्रभो! आपले कथामृत संसारात जे संतप्त प्राणी आहेत, त्यांना जीवन देणारे, शांती देणारे आहे. श्रेष्ठ महापुरुषसुद्धा त्याचे अंतःकरणापासून वर्णन करतात. ते संपूर्ण पापांचा अर्थात् भगवद्विमुखतेचा नाश करणारे आहे. कानावर पडताच सर्व प्रकाराने मंगलच मंगल देणारे आहे. संत महापुरुषाद्वारा त्याचे विस्ताराने वर्णन केले गेले आहे. अशा कथामृताचे पृथ्वीवर जे कथन करतात, ते संसाराला फार विशेषतापूर्वक दान करणारे आहेत अर्थात् संसारावर सर्वात मोठा उपकार, संसाराचे फार मोठे हित करणारे आहेत.

**अध्याय: ( अध्ययनम् ) स्वाध्याय:**'' यानुसार आपल्या वृत्तीचे, स्थितीचे योग्य रीतीने अध्ययन करणे हाच ''स्वाध्याय'' आहे. यातही साधकाने आपल्या वृत्तीवरुन आपल्या स्थितीची परीक्षा करू नये आणि वृत्तींच्या अधीन आपली स्थितीही मानू नये. कारण वृत्ती तर नेहमी येत-जात राहतात, बदलत राहतात. तर मग हा स्वाभाविक प्रश्न निर्माण होतो की, आपण आपल्या वृत्तीना शुद्ध करू नये काय? वास्तविक साधकाचे कर्तव्य वृत्ती शुद्ध करणे हेच असावे आणि ती शुद्धी अंत:करण तसेच त्याच्या वृत्तीना आपले न मानल्याने फार लवकर होते. कारण त्यांना आपले मानणे हीच मूळ अशुद्धी आहे. साक्षात् परमात्म्याचा अंश असल्याने आपले स्वरूप कधी अशुद्ध होतच नाही. केवळ वृत्तींच्या अशुद्धतेमुळेच त्याचा यथार्थ अनुभव येत नाही.

**तप:**—भूक-तहान, सरदी-गरमी, पाऊस इत्यादी सहन करणेसुद्धा एक तप आहे, परंतु या तपात भूक-तहान, इत्यादींना जाणून सहन केले जाते. वास्तविक साधन करत असताना अथवा जीवननिर्वाह करीत असताना देश, काळ, परिस्थितीला अनुसरून जे कष्ट होतात, संकटे, विघ्ने इत्यादी येतात, त्यांना प्रसन्नतापूर्वक सहन करणे हेच ''तप'' आहे.* कारण या तपात पूर्वी केल्या गेलेल्या पापांचा नाश होतो आणि सहन करणाऱ्यात सहन करण्याची एक नवी शक्ती आणि नवीन बल येते.

साधकाने सावध राहिले पाहिजे की, त्याने त्या तपोबलाचा प्रयोग दुसऱ्यांना वरदान देण्यात, शाप देण्यात अथवा अनिष्ट करण्यात तसेच आपली इच्छापूर्ती करण्यात लावू नये, तर त्या बलाला आपल्या साधनेत ज्या बाधा येतात, त्यांना प्रसन्नतेने सहन करण्याची शक्ती वाढविण्यातच लावावे.

साधक जेव्हा साधन करतो, तेव्हा त्या साधनेत अनेक प्रकारची विघ्ने मानत असतो. त्याचे विचार असे असतात—मला एकांत मिळाला, तर मी साधन करू शकतो. वातावरण शुद्ध असेल तर मी साधन करू शकतो इत्यादी. या सर्व अनुकूलतेच्या इच्छा न करणे अर्थात् त्यांच्या अधीन न होणे सुद्धा ''तप'' आहे. साधकाने आपले साधन परिस्थितीच्या अधीन मानू नये, तर त्याने परिस्थितीनुसार आपले साधन बनवावे. साधकाने एकांतात साधन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे, परंतु एकांत नाही मिळाला तर मिळालेली परिस्थिती भगवंताकडून मिळाली असे समजून विशेष उत्साहाने प्रसन्नतापूर्वक साधनेत प्रवृत्त झाले पाहिजे.

**आर्जवम्**—साधेपणाला, सरळतेला ''आर्जव'' म्हणतात. ही सरळता साधकाचा विशेष गुण आहे. जर साधकाने अशी इच्छा केली की, दुसऱ्या लोकांनी मला चांगले समजावे; माझा व्यवहार जर योग्य नसला तर मला लोक श्रेष्ठ समजणार नाहीत. म्हणून मला सरळतेने राहिले पाहिजे तर हे एक प्रकारचे कपटच आहे. यामुळे साधकात कृत्रिमता येते, परंतु साधकात वास्तविक सरळपणाचा साधेपणाचा भाव असला पाहिजे. साधे आणि सरळ झाल्याने लोक त्याला मूर्ख, नासमज म्हणतील परंतु त्यामुळे साधकाची कसलीही हानी होत नाही. आपल्या उद्धारासाठी सरळपणा तर फार उपयोगी आहे—

**कपट गाँठ मन मे नहीं, सबसों सरल सुभाव।**
**''नारायण'' ता भक्त की, लगी किनारे नाव॥**

म्हणून साधकाच्या शरीर, वाणी आणि मनाच्या व्यवहारात कोणतीच कृत्रिमता राहू नये.† त्याच्यात स्वाभाविक सरळता असावी.

# अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम्।
# दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्॥ २॥

**अहिंसा** = अहिंसा,
**सत्यम्** = सत्यभाषण,
**अक्रोध:** = क्रोध न करणे,
**त्याग:** = संसाराच्या कामनेचा त्याग,
**शान्ति:** = अंत:करणात राग-द्वेषजनित चलबिचल न होणे,
**अपैशुनम्** = चुगली न करणे,
**भूतेषु** = प्राण्यांवर
**दया** = दया करणे,
**अलोलुप्त्वम्** = सांसारिक विषयांत

* आगते स्वागतं कुर्याद् गच्छन्तं न निवारयेत्। यथाप्राप्तं सहेत्सर्वं सा तपस्योत्तमोत्तमा॥ (बोधसार)
''प्रारब्धाने जी परिस्थिती येईल, त्याचे स्वागत करावे. जाणाऱ्याला रोखू नये आणि जे जसे प्राप्त होईल तसेच सहन करावे. हेच उत्तमातील उत्तम तप आहे.''

† मनस्येकं वचस्येकं कर्मण्येकं महात्मनाम्। मनस्यनद् वचस्यन्यत् कर्मण्यन्यद् दुरात्मनाम्॥
महात्म्यांचे मन, वचन आणि कर्म ह्या तिन्हीमध्ये एकच गोष्ट असते. परंतु दुष्ट लोकांच्या मनात एक, वचनात दुसरे, तर कर्म तीसऱ्याच प्रकारचे असते. तिन्हीमध्ये वेगवेगळेपणा असतो.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मार्दवम्** | = अंतःकरणाची लालसा न होणे, | **ह्रीः** | = अकर्तव्य करण्यात कोमलता, | **अचापलम्** | = चपलतेचा अभाव, लज्जा, |

***व्याख्या*— अहिंसा—**शरीर, मन, वाणी, भाव इत्यादी-द्वारा कोणाचेही कोणत्याही प्रकारे अनिष्ट न करणे तसेच अनिष्ट न इच्छिणे, ह्याला "अहिंसा" म्हणतात. वास्तविक जेव्हा मनुष्य संसाराला विमुख होऊन परमात्म्याकडेच सन्मुख होतो, तेव्हाच सर्वथा अहिंसा होते त्याचेकडून "अहिंसा" याचे पालन आपोआप होते. परंतु जो आसक्तिपूर्वक, भोगबुद्धीने भोगांचे सेवन करतो, तो कधी सर्वथा अहिंसक होऊ शकत नाही. तो स्वतःचे पतन तर करतोच, ज्या पदार्थाचा तो भोग घेतो, त्यांचाही नाश करतो.

जो संसाराच्या सीमित पदार्थांना व्यक्तिगत (आपले) नसतानाही व्यक्तिगत मानून सुखबुद्धीने भोगतो, तो हिंसाच करतो. कारण समष्टी संसारापासून सेवेसाठी मिळालेले पदार्थ, वस्तू, व्यक्ती इत्यादीपैकी कोणालाही आपल्या भोगासाठी व्यक्तिगत मानणे ही हिंसाच आहे. जर मनुष्याने समष्टी संसारापासून मिळालेल्या वस्तू, पदार्थ, व्यक्ती इत्यादी संसाराच्याच मानून निर्ममतापूर्वक संसाराच्या सेवेत लावल्या तर तो हिंसेपासून वाचू शकतो आणि तोच अहिंसक होऊ शकतो.

जो सुख आणि भोगबुद्धीने भोगांचे सेवन करतो, त्याला पाहून, ज्यांना ते भोग पदार्थ मिळत नाहीत—अशा अभावग्रस्तांना दुःख, संताप होतो. ही त्यांची हिंसाच आहे कारण भोगी व्यक्तीत आपला स्वार्थ आणि सुखबुद्धी राहत असते तसेच दुसऱ्यांच्या दुःखाची बेपरवाइ असते. परंतु जे संत महापुरुष केवळ दुसऱ्यांचे हित करण्यासाठीच जीवननिर्वाह करतात, त्यांना पाहून जरी कोणाला दुःख झाले तरी त्यांना हिंसा लागत नाही कारण ते भोगबुद्धीने जीवननिर्वाह करीतच नाहीत—"**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्**" (४।२१)

केवळ परमात्म्याकडे सम्मुख झालेल्याकडून हिंसा होत नाही कारण तो भोगबुद्धीने पदार्थ इत्यादीचे सेवन करत नाही. परमात्म्याकडे सम्मुख झालेला साधक शरीर, मन, वाणीद्वारा कधी कोणाला दुःख पोहचवीत नाही. जरी त्याच्या बाह्य क्रियेने कोणाला दुःख झालेच तर ते दुःख त्या व्यक्तीच्या स्वतःच्या स्वभावानेच होते. साधकाची तर अंतःकरणातून कधीच कोणालाही थोडेही दुःख देण्याची भावना असता कामा नये. त्याचा भाव निरंतर सर्वांचे हित करण्याचाच असला पाहिजे. "**सर्वभूतहिते रताः**"

साधकाच्या साधनेत जर कोणी अडथळा आणला तर साधकाला त्याच्यावर क्रोध येत नाही किंवा त्याच्या मनात त्याच्या अहिताची भावनाही (हिंसा) उत्पन्न होत नाही. मात्र परमात्म्याकडे सम्मुख होण्यात अडथळा झाल्यास त्याला दुःख होऊ शकते, परंतु ते दुःखसुद्धा सांसारिक दुःखासारखे नसते. साधकाच्या साधनेत बाधा आली तर तो भगवंताची प्रार्थना करतो की, "हे नाथ! माझी कुठे चूक झाली आहे ज्यामुळे ही बाधा होत आहे" अशा विचाराने त्याला रडूही येऊ शकते, परंतु बाधा करणाऱ्याविषयी क्रोध, द्वेष होऊ शकत नाही. बाधा झाली असता साधकात तत्परता आणि सजगता येते. जर बाधा करणाऱ्याविषयी द्वेष उत्पन्न झाला तर जितक्या अंशात द्वेष वृत्ती होते, तितक्या अंशात तत्परतेची उणीव असते, आपल्या साधनेचा आग्रह असतो.

साधकात एक तत्परता असते आणि एक आग्रह असतो. तत्परता असल्याने साधनेत आवड राहते आणि आग्रह असल्यास साधनेची आसक्ती राहते. आवड असल्याने आपल्या साधनेत कुठे कुठे उणीव आहे, त्याचे ज्ञान होते आणि ती उणीव दूर करण्याची शक्ती येते तसेच त्याला नाहीसे करण्याचा प्रयत्नही केला जातो. परंतु आसक्ती असल्यास साधनेत विघ्न करणाऱ्याविषयी द्वेष होण्याची संभावना राहते. वास्तविक पाहिले तर, साधनेत आपली आवड कमी असल्यामुळेच दुसरा आपल्या साधनेत बाधा करतो. जर आपल्या साधनेत आवड कमी नसेल तर दुसरा आपल्या साधनेत बाधा करणार नाही, असा विचार करून सोडून देईल की ,हा जिद्दी आहे, ऐकणार नाही. म्हणून त्याला वाटेल तसे करू द्या.

जसा फुलाचा सुगंध आपोआप पसरतो, तसेच साधकातून पारमार्थिक परमाणू पसरत असतात आणि वायुमंडल शुद्ध होत असते, यामुळे त्याच्याकडून स्वतःस्वाभाविक संपूर्ण प्राण्यावर फार मोठे उपकार आणि हित होत असते. परंतु जो आपल्या दुर्गुण-दुराचाराद्वारा वायुमंडल अशुद्ध करतो, तो प्राणीमात्राची हिंसा करण्याचा अपराधी होतो.

**सत्यम्—**आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून केवळ दुसऱ्याच्या हिताच्या दृष्टीने जसे ऐकले, पाहिले, वाचले, समजले आणि निश्चय केला असेल, त्यापेक्षा कमी अधिक न करता, जसेच्या तसे प्रिय शब्दात सांगणे "सत्य" आहे.

सत्यस्वरूप परमात्म्याची प्राप्ती आणि जाणण्याचा एकमात्र उद्देश झाल्यास साधकाकडून मन, वाणी आणि क्रियेने असत्य व्यवहार होऊ शकत नाही. त्याच्याकडून सत्य व्यवहार, सर्वांच्या हिताचाच व्यवहार होतो. जो सत्याला जाणू इच्छितो, तो सत्याच्याच सम्मुख राहतो. म्हणून त्याच्या

मन, वाणी, शरीराकडून ज्या क्रिया होतात, त्या सर्व उत्साहपूर्वक सत्याकडे जाण्यासाठीच होतात .

**अक्रोधः—**दुसऱ्यांचे अनिष्ट करण्यासाठी अंतःकरणात जी जलनात्मक वृत्ती उत्पन्न होते, ती ''क्रोध'' आहे. परंतु जोपर्यंत अंतःकरणात दुसऱ्याचे अनिष्ट करण्याची भावना उत्पन्न होत नाही तोपर्यंत तो ''क्षोभ'' आहे , ''क्रोध'' नाही.

परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने साधन करणारा मनुष्य आपला अपकार करणाऱ्याचेही अनिष्ट करू इच्छित नाही. तो ही गोष्ट समजतो की, अनिष्ट करणारी व्यक्ती वास्तविक आपले अनिष्ट कधीही करू शकत नाही. हा जो आपणाला दुःख देण्यासाठी आला आहे, पूर्वी आपण काही चूक केली आहे, त्याचेच ते फळ आहे. म्हणून हा आपल्याला शुद्ध करत आहे, निर्मळ करत आहे. जसे डॉक्टर एखाद्या रोग्याच्या अंगाचे ऑपरेशन करतो, त्यावेळी रोगी क्रोध करीत नाही, तर तो त्याला चांगले समजतो, योग्य समजतो. त्याच्या रोगग्रस्त अंगाला कापणे हे त्या रोग्याला निरोगी करण्यासाठीच असते. त्याचप्रमाणे साधकाला कोणी अहिताच्या भावनेने, कोणत्याही रीतीने दुःख दिले तर त्याचा असा भाव होतो की, तो मला शुद्ध, निर्मळ बनविण्यात निमित्त होत आहे, म्हणून त्याच्यावर क्रोध कसा करायचा? तो तर माझ्यावर उपकार करीत आहे आणि भविष्यासाठी सावधान करत आहे की, जी चूक पूर्वी केली गेली आहे, तशी चूक पुन्हा होऊ नये.

जे लोक साधकाचे हित करणारे आहेत, त्याची सेवा करणारे आहेत, ते तर साधकाला सुख पोहचवून त्याचे पुण्य समाप्त करतात. परंतु साधकाला त्यांच्यावर (त्याच्या पुण्याचा नाश केल्यामुळे) क्रोध येत नाही. त्यांच्याविषयी साधकाचा हा भाव असतो की, ते जे माझी सेवा करतात, माझ्या अनुकूल आचरण करतात, ही तर त्यांची सज्जनता आहे, त्यांचा श्रेष्ठ भाव आहे. परंतु जेव्हा मी त्यांच्या सेवेपासून सुख भोगतो, तेव्हा पुण्याचा नाश होतो. अशा प्रकारे साधकाची दृष्टी सेवा करणाऱ्याच्या चांगुलपणावर, शुद्ध नीतीवरच जाते. म्हणून साधकाला दुःख देणाऱ्यावरही क्रोध येत नाही आणि सुख देणाऱ्यावरही क्रोध येत नाही.

**त्यागः—**संसारापासून विमुख होणे हाच वास्तविक त्याग आहे. साधकाच्या जीवनात अंतर्बाह्य त्याग झाला पाहिजे. जसे बाह्य त्याग म्हणजे पाप, अन्याय, अत्याचार, दुराचार इत्यादी आणि सुख, आराम इत्यादीचाही त्याग झाला पाहिजे आणि आतून सांसारिक वस्तूंच्या कामनांचा त्यागही केला पाहिजे. यातही बाह्य त्यागापेक्षा आतल्या कामनेचा त्याग श्रेष्ठ आहे. कामनांचा संपूर्णपणे त्याग झाल्यास तात्काळ शांती प्राप्त होते ''**त्यागाच्छान्तिरनन्तरम्**'' (१२।१२)

साधकासाठी उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या वस्तूंची कामना हीच वास्तविक सर्वात अधिक बाधक आहे. म्हणून कामनेचा संपूर्णपणे त्याग केला पाहिजे. जेव्हा साधकाचा उद्देश केवळ परमात्मप्राप्तीचाच होतो, तेव्हाच त्याग होतो, तेव्हाच त्याच्या कामना कमी होत जातात. कारण सांसारिक भोग आणि संग्रह साधकाचे लक्ष्य नसते. म्हणून तो सांसारिक भोग आणि संग्रहाच्या कामनेचा त्याग करून आपल्या साधनेत अग्रेसर होतो.

**शान्तिः—**अंतःकरणात रागद्वेषजनित चलबिचल न होणे ही ''शान्ति'' होय. कारण संसाराशी राग-द्वेष केल्यानेच अंतःकरणात अशांती निर्माण होते आणि ते नसल्यास अंतःकरण स्वाभाविकच शांत, प्रसन्न राहते.

अनुकूलतेने मागील पुण्याचा नाश होतो आणि त्यात आपला स्वभाव सुधारण्याऐवजी बिघडण्याची अधिक शक्यता राहते. परंतु प्रतिकूलता प्राप्त झाल्यास पापांचा नाश होतो आणि आपल्या स्वभावामध्येही सुधार होतो. ही गोष्ट समजल्यावर प्रतिकूलतेतही आपोआप शांती कायम राहते.

एखाद्या परिस्थितीमुळे साधकात कधी राग-द्वेषाचा भाव उत्पन्न झाला तर त्याच्या मनात अशांती उत्पन्न होते आणि अशांती होताच तो तात्काळ सावधान होतो की, राग-द्वेषपूर्वक कर्म करणे हा माझा उद्देश नाही. या विचाराने मग त्याला शांती मिळते आणि कालान्तराने स्थिर होते.

**अपैशुनम्—**एखाद्याचे दोष दुसऱ्याजवळ सांगून त्याच्यात त्या माणसाविषयी दुर्भाव उत्पन्न करणे ही पिशुनता आहे आणि याचा सर्वथा अभाव हेच ''अपैशुन'' आहे. परमात्मप्राप्तीचा उद्देश असल्याने साधक कधी कोणाची चुगली करीत नाही. जसजसे त्याचे साधन प्रगत होत जाते, तसतशी त्याची दोषदृष्टी आणि द्वेषवृत्ती समाप्त होऊन दुसऱ्याविषयी त्याचा आपोआप चांगला भाव होत जातो. त्याच्या मनात असा विचारही येत नाही की, मी साधन करणारा आहे आणि ही दुसरी (साधन न करणारे) साधारण माणसे आहेत, तर तत्परतेने साधन झाल्यावर त्याला जशी आपली स्थिती (जडतेशी संबंध नसणे) दिसते, तशीच दुसऱ्याचीही स्थिती दिसते की, वास्तविक त्यांचाही जडतेशी संबंध नाही, केवळ संबंध मानलेला आहे. अशा रीतीने जेव्हा त्याच्या दृष्टीत कोणाचाही जडतेशी संबंध दिसतच नाही, तर मग तो कोणाचे दोष कोणासमोर कशाला प्रगट करील?

भक्तिमार्गाचा साधक आपल्या प्रभूला सर्वत्र पाहतो, ज्ञानमार्गाचा साधक केवळ आपल्या स्वरूपालाच पाहतो आणि कर्ममार्गाचा साधक आपल्या सेव्याला पाहतो. म्हणून साधक कोणाचीही चुगली, निंदा अहित इत्यादी करूच कसा शकेल?

**दया भूतेषु**—दुसऱ्यांना दुःखी पाहून त्यांचे दुःख दूर करण्याच्या भावनेला ''दया'' म्हणतात. भगवंताची, संत महात्म्यांची, साधकांची आणि साधारण मनुष्यांची दया वेगवेगळी असते.

**( १ ) भगवंताची दया**—भगवंताची दया सर्वांना शुद्ध करण्यासाठी असते. भक्तलोक या दयेचे दोन प्रकार मानतात—कृपा आणि दया. संपूर्ण माणसांना पापापासून शुद्ध करण्यासाठी त्यांच्या मनाच्या विरुद्ध (प्रतिकूल) परिस्थिती पाठविणे ''कृपा'' आहे आणि अनुकूल परिस्थिती पाठविणे ''दया'' आहे.

**( २ ) संत-महात्म्यांची दया**—संत महात्मालोक दुसऱ्यांच्या दुःखाने दुःखी आणि दुसऱ्यांच्या सुखाने सुखी होत असतात—''**पर दुख दुख सुख सुख देखे पर**'' (मानस ७ । ३८ । १) परंतु वास्तविक त्यांच्या अंतःकरणात दुसऱ्यांच्या दुःखानेही दुःख होत नाही आणि स्वतःच्या दुःखानेही दुःख होत नाही. कारण तत्त्वात सुखही नसते आणि दुःखही नसते. ज्याप्रमाणे समुद्रावर लाटा उसळत असलेल्या दिसतात परंतु समुद्राच्या आत कसलीही लाट नसते. आतून समुद्र शांत (सम) असतो, तसेच व्यवहारात संत दुःखी असलेले दिसतात परंतु ते आतून सुखीही नसतात आणि दुःखीही नसतात. तात्पर्य हे आहे की, वास्तविक ते दुःखी नसतात, उलट त्यांच्याद्वारा दुसऱ्यांचे दुःख दूर करण्याचा प्रयत्न स्वतःवर प्रतिकूल परिस्थिती आल्यास ते त्यात भगवंताची कृपा पाहतात, परंतु दुसऱ्यांना दुःख झाल्यास त्यांना सुखी करण्यासाठी ते त्यांच्या दुःखाला स्वतः आपल्यावर घेतात. जसे इंद्राने अपराधाविना क्रोधी होऊन दधीची ऋषींचा शिरच्छेद केला होता, परंतु जेव्हा इंद्राने स्वतःच्या रक्षणासाठी त्यांच्या आस्थी मागितल्या, तेव्हा दधीची ऋषींनी आपले प्राण सहर्ष सोडून त्यांना आपल्या आस्थी दिल्या. अशा प्रकारे संत महापुरुष दुसऱ्याच्या दुःखाला सहन करू शकत नाहीत, तर त्यांना सुख प्राप्त करून देण्यासाठी आपली सुखसामुग्रीच नव्हे तर प्राणसुद्धा अर्पण करतात, मग तो त्यांचे अहित करणारा का असेना* म्हणून संत महात्म्यांची दया विशेष शुद्ध आणि निर्मळ असते.

**( ३ ) साधकांची दया**—साधक आपल्या मनात दुसऱ्यांचे दुःख दूर करण्याची भावना ठेवतो आणि त्यानुसार त्यांचे दुःख दूर करण्याचा प्रयत्नही करतो. दुसऱ्यांना दुःखी पाहून त्याचे अंतःकरण द्रवित होते, कारण तो आपल्याच दुःखाप्रमाणे दुसऱ्यांचे दुःख समजतो. म्हणून त्याचा असा भाव राहतो की, सर्व सुखी कसे होतील? सर्वांचे चांगले कसे होईल? सर्वांचा उद्धार कसा होईल? सर्वांचे हित कसे होईल? आपल्याकडून तो तसाच प्रयत्न करतो परंतु मी सर्वांचे हित करीत आहे, सर्वांच्या हिताविषयी प्रयत्नशील आहे—ह्या गोष्टीविषयी त्याच्या मनात अभिमान येत नाही. कारण दुसऱ्यांचे दुःख दूर करण्याचा सहज स्वभाव बनल्याने त्याला ह्या स्वतःच्या आचरणात काही विशेषता दिसून येत नाही. म्हणून त्याला अभिमान येत नाही.

जे प्राणी भगवंताला सम्मुख होत नाहीत, दुर्गुण दुराचारांत रत राहतात, दुसऱ्यांचा अपराध करतात आणि आपले पतन करतात. अशा माणसांविषयी साधकाला क्रोध न येता दया येत असते. म्हणून तो नेहमी असा प्रयत्न करत असतो की, हे लोक दुर्गुण-दुराचारापासून कसे परावृत्त होतील? यांचे चांगले कसे होईल? कधी कधी तो त्यांच्या दोषांना दूर करण्यात स्वतःला निर्बल मानून भगवंताची प्रार्थना करतो की, ''हे नाथ! हे लोक ह्या दोषातून मुक्त होवोत आणि आपले भक्त होवोत.''

**( ४ ) साधारण माणसांची दया**—साधारण माणसाच्या दयेत थोडी मलीनता राहते. तो एखाद्या जीवाच्या हिताचा प्रयत्न करतो, त्यावेळी असा विचार करतो की, ''मी किती दयाळू आहे, मी या जीवाला सुख दिले आहे, तर मग मी किती चांगला आहे. प्रत्येक मनुष्य माझ्यासारखा काही दयाळू नाही, एखादाच असतो इत्यादी.'' अशा प्रकारे लोक मला चांगले समजतील, माझा आदर करतील इत्यादी गोष्टीना विचारात घेऊन, आपल्यात महत्त्वबुद्धी ठेवून जी दया केली जाते, त्यात दयेचा अंश तर चांगला आहे, परंतु त्याबरोबर उपर्युक्त मालिन्य असल्याने त्या दयेत अशुद्धी येते.

यातही साधारण दर्जाची माणसे दया तर करत असतात परंतु त्यांची दया ममता असणाऱ्या व्यक्तीवरच होत असते. जसे हे आपल्या परिवाराचे आहेत, आपले मत आणि सिद्धांताला मानणारे आहेत, तर त्यांचे दुःख दूर करण्याच्या इच्छेने त्यांना सुख-आराम देण्याचा प्रयत्न करतात. ही दया ममता आणि पक्षपात युक्त असल्याने अधिक अशुद्ध आहे.

यापेक्षाही खालच्या दर्जाची माणसे केवळ आपल्या सुख आणि स्वार्थाच्या पूर्तीसाठीच दुसऱ्याशी दयेचे

---

* कर्णस्त्वचं शिबिर्मांसं जीवं जीमूतवाहनः। ददौ दधीचिरस्थीनि नास्त्यदेयं महात्मनाम्॥

कर्णाने आपली त्वचा, शिबिने आपले मांस आणि दधीचीने आपल्या आस्थी दिल्या आणि जीमूतवाहनने आपले जीवन (शरीर) दिले. महात्म्यांजवळ (परहितासाठी) न देण्यासारखी कोणतीच वस्तू नसते, ही गोष्ट खरी आहे.

आचरण ठेवतात.

**अलोलुप्त्वम्**—इंद्रियांचा विषयाशी संबंध झाल्याने अथवा दुसऱ्यांना भोग भोगत असलेले पाहून मनात भोग भोगण्याची जी लालसा निर्माण होते तिला "लोलुपता" म्हणतात आणि त्याच्या सर्वथा अभावाचे नाव "अलोलुप्त्व" आहे.

अलोलुपतेचे उपाय—(१) साधकाने विशेष सावध राहून आपल्या इंद्रियांचा भोगाशी संबंध ठेवू नये आणि मनात कधीही असा भाव, असा अभिमान येऊ देऊ नये की, माझा इंद्रियांवर ताबा आहे अर्थात् इंद्रिये मला वश आहेत. तेव्हा माझे काय बिघडणार?

(२)"मी अंत:करणातून परमात्मप्राप्ती इच्छितो, जर कधी मनात विषय लोलुपता झालीच तर माझे पतन होईल आणि मी परमात्म-विमुख होईल" असे साधकाने खूप सावध रहावे आणि कधी अवचित विचलित होण्याचा प्रसंग आला तर "हे नाथ! वाचवा, हे नाथ! वाचवा" अशी तळमळीने हृदयापासून भगवंताची प्रार्थना करावी.

(३) स्त्री-पुरुष किंवा अन्य प्राण्यांची कामविषयक क्रीडा पाहू नये. जर दिसलीच तर असा विचार करावा की, "हा तर चौऱ्यांशी लाख योनींचा रस्ता आहे. हे तर मनुष्य, पशू, पक्षी, कीट-पतंग, राक्षस-असूर, भूत-प्रेत इत्यादी सर्व जीवांमध्येही आहे परंतु मी तर चौऱ्यांशी लाख योनी अर्थात् जन्म-मरणापेक्षा उच्च स्थितीत जाऊ इच्छितो. मी जन्म-मरणाच्या मार्गाचा पथिक नाही. मला तर जन्म-मरणादी दु:खांचा अत्यंत अभाव करून परमात्मप्राप्ती करावयाची आहे" ह्या भावनेला सदैव जागृत ठेवावे आणि शक्यतो कामचेष्टा पाहू नयेत.

**मार्दवम्**—विनाकारण दु:ख देणाऱ्या आणि वैर करणाऱ्या विषयीही अंत:करणात कठोरतेचा भाव न होणे तसेच स्वाभाविक कोमलतेचे राहणे "मार्दव" आहे.*

साधकाच्या हृदयात सर्वांविषयी कोमलतेचा भाव राहतो. त्याच्याविषयी कोणी कठोरतेचा व अहिताचा भाव ठेवला तरीही त्याच्या कोमलतेत काहीही फरक पडत नाही. जरी साधक कधी कोणाला एखाद्या गोष्टीवरुन कठोर बोलला तरी ते कठोर वचन त्या व्यक्तीच्या हिताच्या दृष्टीनेच बोलतो. परंतु नंतर त्याच्या मनात हा विचार येतो की, मी त्याला कठोर का बोललो? मी प्रेमाने किंवा अन्य कोणत्याउपायानेही त्याला समजावू शकलो असतो—अशा प्रकारचा भाव आल्याने कठोरता समाप्त होते आणि कोमलता वाढत जाते.

जरी साधकांच्या भावात आणि वाणीत कोमलता राहत असते तरी त्यांची भिन्न भिन्न प्रकृती असल्याने सर्वांच्या वाणीत एकसारखी कोमलता नसते, परंतु साधकांच्या हृदयात सर्वांविषयी कोमल भाव मात्र राहतो. त्याचप्रमाणे कर्मयोगी, ज्ञानयोगी आणि भक्तियोगी इत्यादी साधकांच्या स्वभावात भिन्नता असल्याने त्यांचे आचरण सर्वांशी भिन्न भिन्न असते, म्हणून त्यांच्या आचरणात एकसारखी कोमलता दिसून येत नाही परंतु अंत:करणात खूप कोमलता राहते.

**ह्री:**—शास्त्र आणि लोकमर्यादेविरुद्ध काम करण्यात जो संकोच होतो त्याचे नाव "**ह्री:**" (लज्जा) आहे. साधकाला साधनेविरुद्ध क्रिया करण्यात लाज वाटते. ती लाज केवळ लोकांच्या पाहण्यानेच येत नाही, तर त्याच्या मनात आपोआप असा विचार येतो की, "राम राम! मी अशी क्रिया कशी करू शकतो? कारण मी तर परमात्म्याशी सम्मुख होणारा (साधक) आहे. लोकही मला साधक समजतात. म्हणून अशा साधनेविरुद्ध क्रिया मी एकांतात अथवा लोका-समोर कशा करू शकतो? अशी लाज वाटल्याने साधक वाईट कर्मापासून हटतो आणि त्याचे आचरण योग्य होऊ लागते. जेव्हा साधक आपली अहंता बदलून टाकतो की, मी सेवक आहे, मी जिज्ञासू आहे, मी भक्त आहे, तेव्हा त्याला आपल्या अहंतेविरुद्ध क्रिया करण्यात स्वाभाविकच लाज वाटते. म्हणून पारमार्थिक उद्देश ठेवणाऱ्या प्रत्येक साधकाने आपली अहंता" "मी साधक आहे, मी सेवक आहे, मी जिज्ञासू आहे, मी भगवद्भक्त आहे—" अशा प्रकारे यथारुची बदलून घेतली पाहिजे, त्यामुळे तो साधनविरोधी कर्मांपासून हटून आपला उद्देश लवकर प्राप्त करून घेऊ शकतो.

**अचापलम्**—कोणतेही कार्य करण्यात चपळता अथवा उतावळेपणा नसणे हे "अचापल" आहे. चपळता (चंचलता) झाल्याने काम लवकर होते, असे नाही. सात्त्विक मनुष्य सर्व कर्म धैर्यपूर्वक करीत असतो, म्हणून त्याचे काम योग्य प्रकारे आणि योग्य वेळी होते. जेव्हा कार्य योग्य होते, तेव्हा त्याच्या अंत:करणात चलबिचल, चिंता होत नाही. चपळता नसल्याने कार्यात दीर्घसूत्रतेचा दोषही येत नाही, तर कार्यात तत्परता येते. त्यामुळे सर्व काम योग्य रीतीने होते. आपले कर्तव्यकर्म करण्याव्यतिरिक्त अन्य कोणतीही इच्छा न राहिल्याने त्याचे चित्त विक्षिप्त आणि चंचल नसते. (१८।२६)

* शरीराच्या प्राधान्याने "आर्जव" आणि अंत:करणाच्या प्राधान्याने "मार्दव" म्हटले जाते—हाच या दोहोत फरक आहे.

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता।**
**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत॥ ३॥**

| | |
|---|---|
| **तेजः** | = तेज (प्रभाव), |
| **क्षमा** | = क्षमा, |
| **धृतिः** | = धैर्य, |
| **शौचम्** | = शरीराची शुद्धी, |
| **अद्रोहः** | = वैरभावाचे न होणे आणि |
| **नातिमानिता** | = मान न इच्छिणे, |
| **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! (हे सर्व) |
| **दैवीम्** | = दैवी- |
| **सम्पदम्** | = सम्पत्ती |
| **अभिजातस्य** | = प्राप्त झालेल्या मनुष्याची (लक्षणे) |
| **भवन्ति** | = आहेत. |

***व्याख्या*— तेजः**—महापुरुषांचा संग मिळाल्यास त्यांच्या प्रभावाने प्रभावित होऊन साधारण मनुष्यसुद्धा दुर्गुण-दुराचारांचा त्याग करून सद्गुण-सदाचारांत लागतो. महापुरुषांच्या त्या शक्तीलाच येथे "तेज" म्हटले आहे. तसे तर क्रोधी माणसाला पाहूनही लोकांना त्याच्या स्वभावा-विरुद्ध काम करण्यास भय वाटते, परंतु हे क्रोधरूपी दोषाचे तेज आहे.

साधकात दैवी-संपत्तीचे गुण प्रगट झाल्याने त्याला पाहून दुसऱ्या लोकांच्या अंतःकरणात स्वाभाविकच सौम्यभाव येतात अर्थात् त्या साधकासमोर दुसरे लोक दुराचार करण्यास लज्जित होतात, कचरतात आणि अनायासच सद्भावपूर्वक सदाचार करू लागतात हेच त्या दैवी संपत्ती प्राप्त झालेल्यांचे तेज (प्रभाव) आहे.

**क्षमा**—विनाकारण अपराध करणाऱ्याला दंड देण्याचे सामर्थ्य असूनही त्याच्या अपराधाला सहन करणे आणि त्याला माफ करणे "क्षमा" आहे.* ही क्षमा मोह-ममता, भय आणि स्वार्थ यांच्या अनुषंगानेही केली जाते. जसे पुत्राच्या अपराधाला पिता क्षमा करतो, तर ही क्षमा मोह-ममतेने झाल्याने शुद्ध नसते. त्याचप्रमाणे एखाद्या बलवान् अथवा क्रूर व्यक्तीकडून आपला अपराध झाल्यास आपण भयाने त्याच्यासमोर काहीही बोलत नाही, तर ही क्षमा भयाला धरून आहे. आपल्या धन, संपत्तीची तपासणी करण्यास तपासणी अधिकारी येतो, त्यावेळी तो आपल्याला धमकावितो, अनुचितही बोलतो आणि त्याचे थांबणेही आपल्याला वाईट लागते तरीही स्वार्थहानीच्या भयाने आपण त्याला काहीही बोलत नाही, तर ही क्षमा स्वार्थाला धरून आहे. परंतु अशी क्षमा वास्तविक क्षमा नव्हे. वास्तविक क्षमा तर तीच आहे जिच्यात "आपले अनिष्ट करणाऱ्यास येथे आणि परलोकातही कोणता दंड मिळू नये"—असा भाव राहतो.

क्षमा मागणेसुद्धा दोन प्रकारे असते—

(१) आपण एखाद्याचा अपकार केला, तर त्याचा दंड आपल्याला मिळू नये या भयानेही क्षमा मागितली जाते, परंतु या क्षमेत स्वार्थाचा भाव असल्याने हे उच्च दर्जाचे क्षमा मागणे नव्हे.

(२) आपल्याकडून एखाद्याचा अपराध झाला, तर आता यानंतर पुढे पूर्ण आयुष्यात असा अपराध पुन्हा कधी करणार नाही—या भावनेने जी क्षमा मागितली जाते, ती आपल्या सुधारणेच्या दृष्टीतून होते आणि अशी क्षमा मागितल्यानेच मनुष्याची उन्नती होते.

मनुष्याने आपल्यात क्षमाभाव यावा ह्यासाठी कोणता उपाय केला पाहिजे? जर मनुष्याने आपल्यासाठी कोणाकडूनही कोणत्याही प्रकारच्या सुखाची आशा ठेवली नाही आणि आपला अपकार करणाऱ्याचे वाईट चिंतले नाही, तर त्यात क्षमाभाव प्रगट होतो.

**धृतिः**—कोणत्याही अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थितीत विचलित न होता आपल्या स्थितीत कायम राहण्याच्या शक्तीचे नाव "धृति" (धैर्य) आहे (१८। ३३).

वृत्ती सात्त्विक असली तर धैर्य ठीक राहते आणि राजसी-तामसी वृत्ती असेल तर धैर्य तसे राहत नाही. जसे बद्रीनारायणाला जाणाऱ्या यात्रिकाला कधी गरमी, चढण इत्यादी प्रतिकूलता आणि कधी थंडावा, उतरण इत्यादी अनुकूलता येते, परंतु यात्रिकाने ह्या दोन्ही परिस्थितींना विचारात न घेता "आपल्याला तर बद्रीनारायणालाच जावयाचे आहे" अशा उद्देशाने धैर्य आणि तत्परतेने चालत राहिले पाहिजे. तसेच साधकांनी चांगल्या वाईट वृत्तीकडे आणि अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीकडे लक्ष देऊ नये. याविषयी

---

* क्षमा आणि अक्रोध यात काय फरक आहे? ज्याने अपराध केला आहे त्याच्याविषयी क्षमेत अशी विशेष दृष्टी असते की, त्याला कधीच कोठेही कोणत्याही प्रकारची शिक्षा होऊ नये आणि अक्रोधात स्वतःकडे दृष्टी राहते की, आपल्यात क्रोध नसावा, ज्वलन नसावी, कोणत्याही प्रकारची चलबिचल नसावी. जरी क्षमेच्या अंतर्गत अक्रोधही येतो तरीपण क्षमाशील म्हटल्यावर क्रोधरहित म्हणण्याची गरज नाही, परंतु क्रोधरहित म्हटल्यावर हा क्षमाशील आहे असे म्हणण्याची आवश्यकता राहते. म्हणून हे दोन्ही गुण (क्षमा आणि अक्रोध) भिन्न भिन्न आहेत.

त्याने धैर्य धारण केले पाहिजे, कारण जो आपला उद्देश सिद्ध करू इच्छितो, तो मार्गात येणाऱ्या सुख-दुःखाला पाहत नाही— "**मनस्वी कार्यार्थी न गणयति दुःखं न च सुखम्॥**" (भर्तृहरिनीतिशतक)

**शौचम्**—बाह्य शुद्धी आणि अंतःशुद्धीचे नाव "शौच" आहे* परमात्मप्राप्तीचा उद्देश ठेवणारा साधक बाह्य शुद्धीकडेही लक्ष देतो कारण बाह्य शुद्धी ठेवल्याने अंतःकरणाची शुद्धी आपोआप होते आणि अंतःकरण शुद्ध झाल्यास बाह्य अशुद्धी त्याला पटत नाही या विषयावर पातञ्जलि महाराजांनी म्हटले आहे—

"**शौचात् स्वाङ्गजुगुप्सा परैरसंसर्गः।**"

(योगदर्शन २।४०)

"शौचाने साधकाला आपल्या शरीराविषयी घृणा अर्थात् अपवित्र बुद्धी होते आणि दुसऱ्याशी संसर्ग करण्याची इच्छा होत नाही."

तात्पर्य, आपल्या शरीराला शुद्ध ठेवल्याने शरीराच्या अपवित्रतेचे ज्ञान होते. शरीराच्या अपवित्रतेचे ज्ञान झाल्याने "सर्व शरीरे याच प्रकारची आहेत" याचा बोध होतो. या बोधाने दुसऱ्या शरीराविषयी जे आकर्षण असते, त्याचा अभाव होतो अर्थात् दुसऱ्या शरीरापासून सुख घेण्याची इच्छा समाप्त होते.

बाह्य शुद्धी चार प्रकाराने होत असते (१) शारीरिक (२) वाचिक (३) कौटुंबिक आणि (४) आर्थिक!

**(१) शारीरिक शुद्धी**—प्रमाद, आळस, आरामी वृत्ती, स्वाद-शौक इत्यादीने शरीर अशुद्ध होते आणि या उलट कार्य-तत्परता, पुरुषार्थ, उद्योग, साधी राहणी इत्यादींनी आवश्यक कार्य केल्यास शरीर शुद्ध होते. त्याचप्रमाणे पाणी आणि माती इत्यादीनेही शारीरिक शुद्धी होते.

**(२) वाचिक शुद्धी**—खोटे बोलणे , कटू बोलणे, विनाकारण बडबडत राहणे, निंदा करणे, चुगली करणे, इत्यादीने वाणी अशुद्ध होते. या दोषांनी रहित होऊन सत्य, प्रिय आणि हितकारक आवश्यक वचन बोलणे (ज्यामुळे दुसऱ्याची पारमार्थिक उन्नती होत असेल आणि देश, गाव, गल्ली, परिवार, कुटुंब इत्यादींचे हित होत असेल) आणि अनावश्यक न बोलणे ही वाणीची शुद्धी आहे.

**(३) कौटुम्बिक शुद्धी**—आपल्या मुलाबाळांना चांगले शिक्षण देणे, ज्यामुळे त्यांचे हित होत असेल, तसेच आचरण करणे. कुटुंबियांचा आपल्यावर जो न्याययुक्त अधिकार आहे, त्याची पूर्तता आपल्या शक्तीनुसार करणे, कुटुंबियात कोणाचाही पक्षपात न करता सर्वांचे समानरूपाने हित करणे—ही कौटुंबिक शुद्धी आहे.

**(४) आर्थिक शुद्धी**—न्याययुक्त, सत्यतापूर्वक दुसऱ्यांच्या हिताकडे दृष्टी ठेवून जे धन कमावले गेले आहे, त्याला यथाशक्ती अरक्षित, अभावग्रस्त, दरिद्री, रोगी, अकालपीडित, भुकेले इत्यादी गरजूंना दिल्याने, तसेच गाय, स्त्री आणि ब्राह्मणांच्या रक्षणार्थ खर्च केल्याने द्रव्याची शुद्धी होते.

त्यागी, वैरागी, तपस्वी, संतमहापुरुषांच्या सेवेत उपयोगात आणल्याने तसेच सद्ग्रंथांना सरळ भाषेत छापून कमी मूल्यात दिल्याने तसेच त्यांचा लोकात प्रचार केल्याने धनाची महान् शुद्धी होते.

परमात्मप्राप्तीचाच उद्देश झाल्यावर स्वतःची (स्व) शुद्धी होते. "स्व"ची शुद्धी झाल्यावर शरीर, वाणी, कुटुंब, धन इत्यादी सर्वच शुद्ध आणि पवित्र होऊ लागतात. शरीरादीक शुद्ध झाल्याने, (अशी व्यक्ती जेथे असेल) तेथील स्थान, वायुमंडळ इत्यादीही शुद्ध होतात. बाह्य शुद्धी आणि पवित्रतेकडे लक्ष दिल्याने शरीराची वास्तविकता अनुभवाला येते, त्यामुळे शरीराविषयी असलेली अहंता, ममता त्याग करण्यात साहाय्यता होते. अशा प्रकारे हे साधनही परमात्म-प्राप्तीत निमित्त बनते.

**अद्रोहः**—विनाकारण अनिष्ट करणाऱ्याविषयीही अंतःकरणात बदला घेण्याची भावना न होणे "अद्रोह†" आहे. साधारण व्यक्तीचे एखाद्याने अनिष्ट केले तर त्याच्या मनात अनिष्ट करणाऱ्याविषयी द्वेषाची एक गाठ बांधली जाते की, संधी मिळताच याचा बदला घेईनच, परंतु ज्याचा उद्देश परमात्मप्राप्तीचा आहे, त्या साधकाचे कोणी कितीही अनिष्ट केले तरी, त्याच्या मनात अनिष्ट करणाऱ्याचा बदला घेण्याची भावनाच उत्पन्न होत नाही. कारण कर्मयोगाचा साधक सर्वांच्या हितासाठी कर्तव्यकर्म करत असतो, ज्ञानयोगाचा साधक सर्वांना आपले स्वरूप समजतो आणि भक्तियोगाचा साधक सर्वांत आपल्या इष्ट भगवंतालाच पाहतो. म्हणून तो कोणाशीही कसा द्रोह करू शकेल?

* येथे "शौचम्" पदाने बाह्य शुद्धीच घेतली पाहिजे, कारण अंतःशुद्धी "सत्त्वसंशुद्धिः" पदाने याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात आलेली आहे.

† क्रोध आणि द्रोह—या दोन्हीत अंतर आहे. आपले अनिष्ट करणाऱ्याविषयी तात्काळ मनात जी ज्वलनात्मक वृत्ती निर्माण होते त्याचे नाव "क्रोध" आहे आणि क्रोधाचा जो भाव मनात घर करून बसतो अर्थात् संधी मिळताच त्याचे अनिष्ट करण्याची जी वैरभावना मनात बसलेली असते, त्याचे नाव "द्रोह" आहे.

**"निज प्रभुमय देखहिं जगत केहि सन करहिं बिरोध॥"**
(मानस ७।११२।ख)

**नातिमानिता**—एक "मानिता" असते आणि एक "अतिमानिता" असते. सामान्य व्यक्तीकडून मानाची इच्छा करणे "मानिता" आहे आणि ज्यांच्याकडून आपण शिक्षण घेतले, ज्यांचा आदर्श ग्रहण केला आणि ग्रहण करू इच्छितो, त्यांच्याकडूनही आपला मान, आदर-सत्कार इच्छिणे "अतिमानिता" आहे. ही मानिता आणि अतिमानिता नसणे "नातिमानिता" आहे.

**स्थूल दृष्टीने मानितेचे दोन भेद होतात—**

**( १ ) सांसारिक मानिता**—धन, विद्या, गुण, बुद्धी, योग्यता, अधिकार, पद, वर्ण, आश्रम इत्यादींविषयी दुसऱ्यापेक्षा आपल्यात एक श्रेष्ठतेचा भाव असतो की, "मी सामान्य माणसाप्रमाणे थोडाच आहे ? माझा किती लोक आदर सत्कार करतात, ते आदर करतात तो योग्यच आहे कारण मी आदराला पात्रच आहे" अशा प्रकारे आपल्याविषयी जी मान्यता असते ती सांसारिक मानिता म्हटली जाते.

**( २ ) पारमार्थिक मानिता**—प्रारंभिक साधनकाळात आपल्यात काही दैवी संपत्ती प्रगट होऊ लागते, तेव्हा साधकाला दुसऱ्यापेक्षा आपल्यात काही विशेषता दिसते. त्याबरोबरच इतर लोकही त्याला हा परमात्म्याकडे जाणारा साधक मानून त्याचा विशेष आदर करतात. त्याबरोबरच "हे साधक आहेत, सज्जन आहेत" अशी प्रशंसाही करतात. त्यामुळे साधकाला आपल्यात विशेषता असल्याचे वाटते, परंतु वास्तविक ही विशेषता आपल्या साधनेत उणीव असल्याकारणानेच दिसत असते. अशी विशेषता दिसणे ही पारमार्थिक मानिता आहे.

जोपर्यंत आपल्यात व्यक्तित्व (एकदेशीयता, परिच्छिन्नता) राहत असते, तोपर्यंतच आपल्यात दुसऱ्यापेक्षा विशेषता दिसून येते. परंतु जस-जसे व्यक्तित्व समाप्त होत जाते, तस-तसे साधकाचा दुसऱ्यापेक्षा आपल्यात विशेषतेचा भाव समाप्त होत जातो. शेवटी या सर्व मानितांचा अभाव होऊन साधकात दैवी-संपत्तीचा गुण "नातिमानिता" प्रकट होतो.

दैवी-संपत्तीचे जितके सद्गुण सदाचार आहेत, त्यांना पूर्णपणे जागृत करण्याचा उद्देश तर साधकाचा असलाच पाहिजे. मात्र प्रकृतीच्या (स्वभाव) भिन्नतेने कोणात कोण्या गुणाची उणीव, तर कोणात कोण्या गुणाची उणीव राहू शकते. परंतु ती उणीव साधकाच्या मनात खटकत राहते आणि तो प्रभूचा आश्रय घेऊन आपली साधना तत्परतेने करीत राहतो. म्हणून भगवत्कृपेने ती उणीव नाहीशी होत जाते. उणीव जस-जसी नाहीशी होत जाते तस-तसा उत्साह आणि त्या उणीवेची उत्तरोत्तर समाप्ती होण्याची संभावना वाढतच जाते. त्यामुळे दुर्गुण-दुराचार संपूर्णपणे नष्ट होऊन सद्गुण-सदाचार अर्थात् दैवी संपत्ती प्रगट होते.

**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत**—भगवान् म्हणतात की, हे अर्जुन! ही सर्व दैवी संपत्तीला प्राप्त झालेल्या माणसांची लक्षणे आहेत.

परमात्मप्राप्तीचा उद्देश झाल्यावर ही दैवी संपत्तीची लक्षणे साधकात स्वाभाविकच येऊ लागतात. काही लक्षणे पूर्वजन्मीच्या संस्कारानेही जागृत होतात. परंतु साधक या गुणांना आपले मानत नाही आणि आपल्या पुरुषार्थानेही कमाविलेले मानीत नाही तर गुणांच्या येण्यात भगवंताचीच कृपा मानतो. कधी विचार केल्यावर साधकाच्या लक्षात येते की, माझ्यात ह्यापूर्वी अशा वृत्ती नव्हत्या, असे सद्गुण नव्हते, मग हे आले कोठून ? तर मग हे सर्व भगवत्कृपेमुळेच आले आहेत—असा अनुभव झाल्याने त्या साधकाला दैवी संपत्तीचा अभिमान येत नाही.

साधकाने दैवी संपत्तीचे गुण आपले मानू नयेत, कारण ही देवाची—परमात्म्याची संपत्ती आहे, व्यक्तिगत (आपली) कोणाचीही नाही. जर व्यक्तिगत असती, तर ही आपल्यातच राहिली असती, कोण्या दुसऱ्या व्यक्तीची राहिली नसती. हिला व्यक्तिगत मानल्यानेच अभिमान येतो. अभिमान आसुरी-संपत्तीचे मुख्य लक्षण आहे. अभिमानाच्या छायेतच आसुरी-संपत्तीचे सर्व अवगुण राहतात. जर दैवी-संपत्तीने आसुरी-संपत्ती (अभिमान) उत्पन्न झाली तर मग आसुरी-संपत्ती कधी समाप्तच होणार नाही. परंतु दैवी-संपत्तीपासून आसुरी-संपत्ती कधी उत्पन्न होत नाही, तर दैवी-संपत्तीच्या गुणाबरोबर आसुरी-संपत्तीचे जे अवगुण राहतात, त्यापासूनच गुणांचा अभिमान उत्पन्न होतो अर्थात् साधनेबरोबर काही काही असाधन राहिल्यामुळेच अभिमान इत्यादी दोष उत्पन्न होतात. जसे एखाद्याला सत्य बोलण्याचा अभिमान असतो, तर त्याच्या मूळात तो सत्याबरोबर असत्यही बोलतो, त्यामुळेच सत्याचा अभिमान येतो. तात्पर्य दैवी-संपत्तीच्या गुणांना आपले मानल्याने तसेच गुणाबरोबर अवगुण राहिल्यानेच अभिमान येतो. दैवी-संपत्तीचे संपूर्णपणे गुण बाणल्यास गुणांचा अभिमान होऊच शकत नाही.

येथे दैवी-संपत्ती म्हणण्याचे तात्पर्य, ही भगवंताची संपत्ती आहे. म्हणून भगवंताचा संबंध असल्याने, त्यांचा आश्रय घेतल्याने शरणागत भक्तामध्ये ही संपत्ती स्वाभाविक-

पणे येते. जसे शबरीच्या प्रसंगात श्रीरामचंद्रांनी म्हटले आहे—

**नवधा भगति कहउँ तोहि पाहीं। सावधान सुनु धरु मन माहीं॥**

**........................................................॥**

**नव महुँ एकउ जिन्ह के होई। नारि पुरुष सचराचर कोई॥**

**सोइ अतिसय प्रिय भामिनि मोरे। सकल प्रकार भगति दृढ तोरे॥**

(मानस ३।३५-३६)

मनुष्य, देवता, भूत-पिशाच, पशु-पक्षी, नारकीय जीव, कीट-पतंग, लता-वृक्ष इत्यादी जितके काही स्थावर-जंगम प्राणी आहेत, त्या सर्वात आपापल्या योनीनुसार मिळालेले शरीर आजारी किंवा जीर्ण झाल्यावरही "मी जिवंत रहावे, माझे प्राण कायम रहावेत" अशी इच्छा कायम राहते.* अशी इच्छा होणे हीच आसुरी-संपत्ती आहे.

त्यागी-वैरागी साधकांमध्येही प्राण कायम राहण्याची इच्छा राहते. परंतु त्यांच्यात प्राण-पोषण बुद्धी, इंद्रिय-लोलुपता राहत नाही, कारण त्यांचा उद्देश परमात्मा असतो, शरीर आणि संसार नसतो.

जेव्हा साधक भक्ताचे भगवंतात प्रेम होते तेव्हा त्याला भगवंत प्राणापेक्षाही प्रिय वाटतात. प्राणांचा मोह न राहिल्याने त्याच्या प्राणांचा आधार केवळ भगवान् होतात. म्हणून तो भगवंताला "प्राणनाथ! प्राणेश्वर! प्राणप्रिय!" इत्यादी संबोधनांनी त्यांचा धावा करतो. भगवंताचा वियोग सहन न झाल्याने त्याचा प्राणांतही होऊ शकतो. कारण मनुष्य ज्या वस्तूला प्राणापेक्षाही अधिक महत्त्व देतो, त्याच्यासाठी जर प्राणांचा त्याग करावा लागला तर तो सहर्ष प्राणांचा त्याग करतो. जसे पतिव्रता स्त्री पतीला प्राणापेक्षाही अधिक प्रिय (प्राणनाथ) समजते, तर तिचा प्राण, शरीर, वस्तू, व्यक्ती इत्यादीमध्ये मोह राहत नाही. म्हणूनच पतीच्या मृत्यूनंतर ती त्याच्या वियोगात प्रसन्नतापूर्वक सती जाते. तात्पर्य, ज्यावेळी केवळ भगवंतात अनन्यप्रेम होते, त्यावेळी मग प्राणांचा मोह राहत नाही. प्राणांचा मोह न राहिल्यामुळे आसुरी-संपत्ती संपूर्णपणे समाप्त होते आणि दैवी-संपत्ती आपोआप प्रगट होते. याच गोष्टीचा संकेत गोस्वामी तुलसीदासजी महाराज यांनी अशा प्रकारे केला आहे—

**प्रेम भगति जल बिनु रघुराई। अभिअंतर मल कबहुँ न जाई॥**

(मानस ७।४९।३)

*__संबंध__—आत्तापर्यंत एका परमात्म्याचाच उद्देश ठेवणाऱ्यांची दैवी-संपत्ती सांगितली, परंतु सांसारिक भोग भोगणे आणि संग्रह करणे हाच ज्यांचा उद्देश आहे, अशा प्राणपोषणपरायण लोकांची कोणती संपत्ती असते—हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च।
## अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम्॥४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **च** | = तसेच | **आसुरीम्** | = आसुरी |
| **दम्भः** | = दंभ करणे, | **पारुष्यम्** | = कठोरता असणे | **सम्पदम्** | = संपत्तीला |
| **दर्पः** | = घमेंड करणे | **च** | = आणि | **अभिजातस्य** | = प्राप्त झालेल्या मनुष्याची (लक्षणे) आहेत. |
| **च** | = आणि | **अज्ञानम्, एव** | = अविवेक असणेही —(हे सर्वच) | | |
| **अभिमानः** | = अभिमान करणे, | | | | |
| **क्रोधः** | = क्रोध करणे | | | | |

*__व्याख्या__*— **दम्भः**—मान, मोठेपणा, पूजा, प्रसिद्धी, इत्यादी प्राप्त करण्यासाठी, आपली तशी योग्यता नसतानाही तशी ती दाखविणे याचे नाव 'दम्भ' आहे. हा दम्भ दोन प्रकारचा असतो—

**( १ ) सद्गुण-सदाचारांना अनुसरून**—आपल्याला धर्मात्मा, साधक, विद्वान, गुणवान् इत्यादी प्रकट करणे अर्थात् आपले तसे आचरण नसतानाही, आपल्यात श्रेष्ठ गुण असल्याचे आचरण दाखविणे, थोडे असले तर खूप दाखविणे, भोगी असूनही स्वतःला योगी दाखविणे इत्यादी दिखावटी भाव आणि क्रिया असणे—हा सद्गुण सदाचारांना अनुसरून 'दम्भ' आहे.

**( २ ) दुर्गुण-दुराचारांना अनुसरून**—ज्याचे आचरण खाणे-पिणे स्वाभाविक अशुद्ध नाही अशी व्यक्तीही, ज्याचे आचरण, खाणे-पिणे अशुद्ध आहे, अशा दुर्गुणी-दुराचारी लोकात जाऊन त्यांना खूश करून आपला प्रभाव दाखविण्यासाठी, मान-आदर प्राप्त करण्यासाठी, आपल्या

* यज्जीर्यत्यपि देहेऽस्मिन् जीविताशा बलीयसी॥ (श्रीमद्भा० १०।१४।५३)

मनाला पसंत नसतानाही तसे आचरण, खाणे-पिणे करणे—हा दुर्गुण-दुराचारांना अनुसरून 'दम्भ' आहे.

तात्पर्य, जेव्हा मनुष्य प्राण, शरीर, धन, संपत्ती, आदर, महिमा इत्यादींना प्राधान्य देऊ लागतो, तेव्हा त्याच्यात दम्भ निर्माण होतो.

**दर्पः**—घमेंड करण्यास 'दर्प' म्हणतात. धन, वैभव, जमीन, मालमत्ता, घर-परिवार इत्यादी ममता असणाऱ्या वस्तूंना अनुसरून आपल्यामध्ये जो मोठेपणाचा अनुभव होतो तो 'दर्प' आहे. जसे माझ्याजवळ इतके धन आहे, माझा एवढा मोठा परिवार आहे, माझे एवढे राज्य आहे माझ्याजवळ एवढी इस्टेट आहे, मला अनुकूल इतके लोक आहेत, इतकी माणसे माझी री ओढतात, माझ्या पक्षात खूप लोक सामिल आहेत, धन, संपत्ती, वैभव यात माझी कोण बरोबरी करू शकतो?, माझ्या ताब्यात एवढी मोठी पदे आहेत, अधिकार आहेत. संसारात माझी केवढी मोठी प्रतिष्ठा आणि यश आहे? माझे पुष्कळ अनुयायी आहेत, माझा सांप्रदाय किती उच्च दर्जाचा आहे, माझे गुरूजी किती प्रभावशाली आहेत? इत्यादी, इत्यादी.

**अभिमानः**—वस्तूविषयी अहंतायुक्त अर्थात् स्थूल, सूक्ष्म आणि कारणशरीर यांच्या अनुषंगाने आपल्यात मोठेपणाचा जो अनुभव होतो, त्याचे नाव 'अभिमान' आहे.* जसे मी जातीत उच्च आहे, मी वर्णाश्रमात श्रेष्ठ आहे, माझ्या जातीत माझी प्रधानता आहे. संपूर्ण गाव मला अनुकूल आहे अर्थात् मी जे काही म्हणेल ते सर्व मान्य करतील. मी ज्याला आश्रय देईल, त्याच्या विरुद्ध चालण्यात सर्व लोक भयभीत होतात आणि माझा ज्याच्याशी विरोध आहे त्याला कोणीही साथ देण्यास भयभीत होतो, राजदरबारातही माझा आदर आहे, म्हणून मी जे काही सांगेल, त्याला कोणी टाळणार नाही. मी न्याय अन्याय जे काही करेन, त्याला कोणी टाळू शकत नाही, विरोध करू शकत नाही, मी मोठा विद्वान आहे, मी अणिमा, महिमा, गरिमा इत्यादी सिद्धींना जाणतो, म्हणून सर्व जगाला हलवू शकतो इत्यादी इत्यादी.

**क्रोधः**—दुसऱ्यांचे अनिष्ट करण्यासाठी अंतःकरणात जी जळण्याची वृत्ती असते त्याला 'क्रोध' म्हणतात.

मनुष्याच्या स्वभावाविरुद्ध कोणी काम केले तर त्याचे अनिष्ट करण्यासाठी अंतःकरण उत्तेजित होऊन जी जलनात्मक वृत्ती निर्माण होते, तिला क्रोध म्हणतात. क्रोध आणि क्षोभ यात फरक आहे. मूल दांडगाई करते, सांगितलेले ऐकत नाही, अशा वेळी आई बाप उत्तेजित होऊन त्याला मारतात तो त्यांचा 'क्षोभ' (हृदयाची चलबिचल) आहे, क्रोध नाही. कारण त्यात मुलाचे अनिष्ट करण्याचा हेतू नसतोच, तर मुलाच्या हिताची भावना असते. परंतु उत्तेजित होऊन दुसऱ्याचे अनिष्ट, अहित करून त्याला दुःख देण्यात जो सुखाचा अनुभव होतो. तो क्रोध आहे. आसुरी प्रकृती असणाऱ्यात हाच क्रोध असतो.

क्रोधाला वशीभूत होऊन मनुष्य न करण्यालायक काम देखील करून बसतो, ज्याचे फल म्हणून त्याला स्वतःला पश्चात्ताप करावा लागतो. क्रोधी मनुष्य उत्तेजित होऊन दुसऱ्याचा अपकार तर करतो, परंतु क्रोधाने त्याचा स्वतःचा अपकार कमी होत नाही, कारण आपले अनिष्ट केल्या-शिवाय क्रोधी मनुष्य दुसऱ्याचे अनिष्ट करू शकत नाही. यातही एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, क्रोधी मनुष्य ज्याचे अनिष्ट करतो, त्याचे स्वतःच्या एखाद्या दुष्कर्माचे जे फल भोगरूपाने येणारे असते, तेच आलेले असते, अर्थात् त्याचे नवीन काही अनिष्ट होऊ शकत नाही. परंतु क्रोधी मनुष्याचा, दुसऱ्याचे अनिष्ट करण्याच्या भावनेने आणि अनिष्ट करण्याने नवीन पाप संग्रह होईल, तसेच त्याचा स्वभावही बिघडून जाईल. हा स्वभाव त्याला नरकात घेऊन जाण्याला निमित्त बनेल आणि तो ज्या योनीत जाईल तेथे त्याला दुःख देईल.

क्रोध स्वतःलाच जाळतो.† क्रोधी व्यक्तीची संसारात चांगली ख्याती राहत नाही उलट निंदाच होत राहते. स्वतः-च्या परिवारातील लोकही क्रोधी व्यक्तीला भितात. याच अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात भगवंतांनी क्रोधाला नरकाचा दरवाजा म्हटले आहे. जेव्हा मनुष्याच्या स्वार्थात आणि अभिमानात बाधा येते, तेव्हा क्रोध उत्पन्न होतो. मग क्रोधातून सम्मोह, सम्मोहातून स्मृतिविभ्रम, स्मृति-

* जेथे अभिमान आणि दर्प दोन्हीपैकी कोणताही एक येतो तेथे अभिमानाच्या अंतर्गत दर्प आणि दर्पाच्या अंतर्गत अभिमान येतो. परंतु जेव्हा हे दोन्ही एकाच वेळी बरोबर स्वतंत्ररूपाने येतात, तेथे दोन्हीमध्ये थोडा फरक पडतो. 'ममते' विषयी 'दर्प' आणि 'अहंते' विषयी येणारा तो 'अभिमान' म्हटला जातो. अर्थात् बाह्य पदार्थाविषयी आपल्यात जो मोठेपणा दिसतो तो 'दर्प' आणि विद्या, बुद्धी इत्यादी आंतरिक पदार्थाविषयी आपल्यात जी श्रेष्ठता वाटते, तो 'अभिमान' आहे.

† क्रोधो हि शत्रुः प्रथमो नराणां देहस्थितो देह विनाशनाय।
यथास्थितः काष्ठगतो हि वन्हिः स एव वन्हिर्दहते शरीरम्॥

'क्रोधच मनुष्याचा प्रथम शत्रू आहे, जो देहात राहून देहाचाच विनाश करतो. जसे लाकडातील अग्नी लाकडालाच जाळतो, तसे देहात राहणारा क्रोधरूपी अग्नी देहालाच जाळतो.'

विभ्रमातून बुद्धिनाश आणि बुद्धिनाशातून मनुष्याचे पतन होते (२।६२-६३)

**पारुष्यम्**—कठोरतेचे नाव 'पारुष्य' आहे. हे अनेक प्रकारचे असते. जसे शरीराने अकडून चालणे, वाकडे चालणे, हे शारीरिक पारुष्य आहे. डोळ्यांनी वाकडे-तिकडे पाहणे- हे डोळ्याचे पारुष्य आहे. वाणीने कठोर बोलणे, त्यामुळे दुसरे भयभीत होतात, हे वाणीचे पारुष्य आहे. दुसऱ्यांवर दु:ख, संकट कोसळल्यावरही त्यांची साहाय्यता न करता खूश होणे इत्यादी जे कठोर भाव आहेत हे हृदयाचे पारुष्य आहे.

जे शरीर आणि प्राणाशी मिसळून गेले आहेत, अशा माणसांना जर दुसऱ्यांची क्रिया, बोलणे पसंत नसले तर ते त्याच्या बदल्यात त्यांना कठोर बोलतात, दु:ख देतात आणि स्वत: खूश होऊन म्हणतात की, 'आपण पाहिले की नाही? मी त्याची अशी जिरविली की आता पुन: तो माझ्याशी बोलण्याची हिम्मत करू शकेल काय?' हे सर्व व्यवहारातील पारुष्य आहे.

स्वार्थबुद्धीचे अधिक्य राहिल्याने मनुष्य आपला मतलब सिद्ध करण्यासाठी आपल्या क्रियांनी दुसऱ्यांना कष्ट होतील, त्यांच्यावर काही संकट ओढवेल, ह्याचा तो विचारच करू शकत नाही. हृदयामध्ये कठोर भाव असल्याने तो केवळ आपला मतलब पाहतो आणि त्याचे मन, वाणी, शरीर आचरण इत्यादी सर्व ठिकाणी कठोरता असते. स्वार्थ-भावाची वृत्ती फार मोठ्या प्रमाणात वाढते, एवढेच नव्हे तर तो हिंसा इत्यादी देखील करतो, त्यामुळे त्याच्या स्वभावात स्वाभाविकच क्रूरता येते. क्रूरता आल्याने अंत:करणात सौम्यता मुळीच राहत नाही. सौम्यता न राहिल्याने त्याच्या आचरणात, देण्या-घेण्यात स्वाभाविकच कठोरता राहत असते. म्हणून तो केवळ दुसऱ्याकडून पैसे उकळणे, दुसऱ्यांना दु:ख देणे इत्यादीत लागून राहतो. याचा परिणाम मला सुख होईल का दु:ख होईल याविषयी तो विचारच करू शकत नाही.

**अज्ञानम्**—येथे 'अज्ञान' अविवेकाला म्हटले आहे. अविवेकी पुरुषांना सत्-असत्, सार-असार, कर्तव्य-अकर्तव्य इत्यादींचा बोध होत नाही. कारण त्यांची दृष्टी नाशवान् पदार्थांच्या भोग आणि संग्रहावरच लागलेली राहते. म्हणून (परिणामावर दृष्टी नसल्यामुळे) ते विचारच करू शकत नाहीत की, हे नाशवान् पदार्थ कोठपर्यंत आपल्याबरोबर राहतील आणि आपण त्यांच्याबरोबर कोठपर्यंत राहणार आहोत! पशूप्रमाणे केवळ प्राणपोषणातच लागून राहिल्याने ते कर्तव्य आणि अकर्तव्य या गोष्टींना जाणू शकत नाहीत आणि जाणण्याची इच्छाही ठेवत नाहीत.

ते तात्कालिक संयोगजन्य सुखालाच सुख मानतात आणि शरीर तसेच इंद्रिये त्यांच्या प्रतिकूल संयोगालाच दु:ख मानतात. म्हणून ते प्रयत्न तर सुखासाठीच करतात परंतु परिणामी त्यांना पूर्वीपेक्षा जास्त दु:ख प्राप्त होते.* इतक्यावरही ते जागृत होत नाहीत की, याचा आमच्यावर काय परिणाम होणार आहे? ते तर मान-सन्मान, सुख-आराम, धन-संपत्ती इत्यादींच्या प्रलोभनात येऊन न करण्यायोग्य कामही करू लागतात, त्याचा परिणाम त्यांच्यासाठी तसेच जगासाठीही फार अहितकारक होत असतो.

**अभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम्—हे** पार्थ! ही सर्व आसुरी†-संपत्तीला प्राप्त झालेल्या माणसांची लक्षणे आहेत. मरणधर्मी शरीराशी ऐक्य मानून ''मी कधी मरू नये, सदा जिवंत रहावे आणि सुख भोगत रहावे''—अशी इच्छा ठेवणाऱ्या मनुष्याच्या अंत:करणात ही लक्षणे असतात.

अठराव्या अध्यायाच्या चाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, कोणताही सामान्य प्राणी प्रकृतीच्या गुणांच्या संबंधाने सर्वथा रहित नाही. यावरुन सिद्ध होते की, प्रत्येक जीव परमात्म्याचा अंश असूनही प्रकृतीशी संबंध ठेवूनच उत्पन्न होतो. प्रकृतीच्या संबंधाचे तात्पर्य, प्रकृतीचे कार्य शरीराविषयी ''मी'', ''माझे'' याचा संबंध (तादात्म्य) आणि पदार्थांविषयी ममता, आसक्ती तसेच कामना हे आहे. शरीराविषयी ''मी'', ''माझे'' चा संबंधच आसुरी-संपत्तीचे मूलभूत लक्षण आहे. ज्याचा प्रकृतीशी प्रामुख्याने संबंध आहे, त्याच्यासाठीच येथे म्हटले गेले आहे की, तो आसुरी-संपत्तीला प्राप्त झाला आहे. प्रकृतीशी संबंध जीवाने स्वत: मानलेला आहे. म्हणून तो वाटेल तेव्हा त्याचा त्याग करू शकतो. कारण जीव (आत्मा) चेतन तसेच निर्विकार आहे आणि प्रकृती जड

---

* कर्माण्यारभमाणानां दु:खहत्यै सुखाय च। पश्येत् पाकविपर्यासं मिथुनीचारिणां नृणाम्॥ (श्रीमद्भा० ११।३।१८)

''राजन्! स्त्री-पुरुष संबंधादी बंधनांनी बद्ध पुरुष तर सुखप्राप्ती आणि दु:ख-निवृत्तीसाठीच कर्म करतात, परंतु जे पुरुष माया तरून जाऊ इच्छितात, त्यांनी आपल्या कर्माचे फळ कसे विपरीत मिळत आहे, यावर विचार करावा. सुखाऐवजी दु:ख प्राप्त होते आणि दु:ख दूर होण्याऐवजी दु:ख वाढत जाते.''

† येथे ''आसुरी'' शब्दात देवतांचा विरोध वाचक ''नञ्'' समास नाही. उलट ''असुषु प्राणेषु रमन्ते इति असुरा:'' यानुसार जे लोक केवळ इंद्रिये आणि प्राणांचे पोषण करण्यातच मग्न आहेत अर्थात् जे केवळ संयोगजन्य सुखातच आसक्त आहेत, त्या मनुष्यांचा वाचक येथे ''असुर:'' शब्द आहे. तात्पर्य ज्यांचा उद्देश परमात्मप्राप्ती नाही आणि जे शरीर धारण करून केवळ भोग भोगू इच्छितात, ते असुर आहेत. त्या असुरांच्या संपत्तीचे नाव ''आसुरी-संपत्ती'' आहे.

तसेच प्रतिक्षण परिवर्तनशील आहे. म्हणून चेतनाचा वास्तविक जडाशी संबंध नाहीच, केवळ मानलेला आहे. हा संबंध सोडताच आसुरी-संपत्ती संपूर्णपणे समाप्त होते. अशा प्रकारे मनुष्यामध्ये आसुरी-संपत्ती समाप्त करण्याची पूर्ण योग्यता आहे. तात्पर्य आसुरी-संपत्ती प्राप्त झाली असतानाही तो प्रकृतीशी आपला संपूर्णपणे संबंध-विच्छेद करून आसुरी-संपत्ती समाप्त करू शकतो.

प्राणाविषयी जस-जसा मोह होतो, तस-तशी आसुरी-संपत्ती अधिक वाढत जाते. आसुरी-संपत्ती अत्यधिक वाढल्याने मनुष्य आपल्या प्राणाचे रक्षण करण्यासाठी आणि सुख भोगण्यासाठी दुसऱ्यांचे नुकसानसुद्धा करतो. एवढेच नव्हे, तर दुसऱ्यांची हत्या करण्यालाही मागे पुढे पाहत नाही.

मनुष्य जेव्हा अस्थायीला स्थायी मानतो तेव्हा आसुरी संपत्तीचे, दुर्गुण दुराचारांचे संपूर्ण समूह त्यात येतात. तात्पर्य, असत्चा संग झाल्याने असत् आचरण, असत् भाव आणि दुर्गुण न बोलावता तसेच विनाप्रयत्न आपोआप येतात, जे मनुष्याला परमात्मविमुख करून अधोगतीस नेतात.

***संबंध*—*आता भगवान् दैवी आणि आसुरी—दोन्ही प्रकारच्या संपत्तीचे फल सांगतात.***

**दैवी सम्पद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता।**
**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव॥५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **दैवी** | = दैवी- | **निबन्धाय** | = बंधनासाठी | **अभिजातः** | = प्राप्त झाला |
| **सम्पत्** | = संपत्ती | **मता** | = मानली गेली आहे. | **असि** | = आहेस (म्हणून तू) |
| **विमोक्षाय** | = मुक्तीसाठी (आणि) | **पाण्डव** | = हे पांडव! (तू) | **मा, शुचः** | = शोक (चिंता) करू नको. |
| **आसुरी** | = आसुरी-संपत्ती | **दैवीम्** | = दैवी- | | |
| | | **सम्पदम्** | = संपत्तीला | | |

*व्याख्या*— **दैवी सम्पद्विमोक्षाय**—मला भगवंताच्या दिशेनेच वाटचाल करावयाची आहे, हा भाव जितका स्पष्ट-पणे होईल तितकाच तो भगवंतांना सम्मुख होतो. भगवंताशी सम्मुख झाल्याने त्याच्यात संसाराशी विमुखता येते. संसाराशी विमुखता झाल्याने आसुरी-संपत्तीचे जितके दुर्गुण-दुराचार आहेत, ते कमी होऊ लागतात आणि दैवी-संपत्तीचे जितके सद्गुण-सदाचार असतात ते प्रगट होऊ लागतात. त्यामुळे साधकाची भगवंताविषयी आणि भगवंताच्या नाम, रूप, लीला, गुण, चरित्र इत्यादीमध्ये आवड उत्पन्न होते.

यात विशेषतेने लक्ष करण्याची गोष्ट अशी आहे की, साधकाचा उद्देश जितका दृढ असेल, तितकाच त्याचा परमात्म्याशी जो अनादिकाळाचा संबंध आहे, तो प्रगट होईल आणि संसाराशी जो मानलेला संबंध आहे तो समाप्त होईल. समाप्त काय होईल तो तर प्रतिक्षण समाप्तच होत आहे. वास्तविक प्रकृतीशी संबंध नाहीच. केवळ या जीवाने संबंध मानला आहे. या मानलेल्या संबंधाच्या सद्भावनेवर अर्थात् ''शरीरच मी आहे आणि शरीरच माझे आहे''—या सद्भावनेवरच संसार टिकून आहे. ही सद्भावना समाप्त होताच संसाराशी मानलेला संबंध समाप्त होईल आणि दैवी-संपत्तीचे संपूर्ण गुण प्रगट होतील. जे मुक्तीला कारण आहेत.

दैवी-संपत्ती केवळ आपल्यासाठीच नाही, तर संपूर्ण प्राण्यांच्या कल्याणासाठी आहे. जसे कुटुंबात लहान, मोठी; म्हातारी माणसे इत्यादी अनेक सदस्य असतात, परंतु सर्वांचे पालन-पोषण करण्यासाठी कुटुंबप्रमुख स्वतःउद्योग करतो, तसेच संपूर्ण संसाराचा उद्धार करण्यासाठी भगवंतांनी मनुष्याला निर्माण केले. तो मनुष्य, एवढेच काय, भगवंतांनी दिलेल्या विलक्षण शक्तिद्वारा भगवंतांना सम्मुख होऊन, भगवंताची सेवा करून त्यांनासुद्धा आपल्या वशमध्ये करू शकतो. असा विचित्र अधिकार त्याला दिला आहे. म्हणून मनुष्याने त्या अधिकारानुसार यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत, जप, ध्यान, स्वाध्याय, सत्संग, इत्यादी जेवढा साधनसमुदाय आहे त्याचे अनुष्ठान केवळ अनंत ब्रह्मांडांच्या अनंत जीवांच्या कल्याणासाठीच करावे आणि दृढतेने असा संकल्प करून प्रार्थना करावी की, ''हे नाथ! संपूर्ण जीवांचे कल्याण होवो, संपूर्ण जीव जीवन्मुक्त व्हावेत, संपूर्ण जीव आपले प्रेमी भक्त बनावेत, परंतु हे नाथ! हे होईल केवळ आपल्या कृपेनेच! मी तर केवळ प्रार्थना करू शकतो आणि ती देखील आपण दिलेल्या सद्बुद्धीद्वाराच!'' असा भाव ठेवून आपले म्हणविले जाणारे शरीर, इंद्रिये मन, बुद्धी, धन-संपत्ती इत्यादी सर्व वस्तूंना संपूर्ण संसाराच्या कल्याणासाठी भगवंतांना अर्पण करावे.* असे केल्याने आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या वस्तूंची तर संसाराशी आणि आपली भगवंताशी स्वतःसिद्ध एकता

* संपूर्ण जीवांच्या कल्याणाचा जो भाव आहे, तो भावही भगवंतांनी दिलेली विभूती (दैवी संपत्ती) आहे, आपली नव्हे. आपले तर केवळ भगवंतच आहेत.

प्रगट होईल. याला भगवंतांनी "**दैवी सम्पद्विमोक्षाय**" पदांनी म्हटले आहे.

**निबन्धायासुरी मता**—जी जन्म-मरण देणारी आहे ती सर्व आसुरी-संपत्ती आहे. जोपर्यंत मनुष्याच्या अहंतेचे परिवर्तन होत नाही, तोपर्यंत उत्तम प्रकारचे गुण धारण केले तरी ते निरर्थक तर जात नाहीत परंतु त्यामुळे त्याची मुक्ती होईल असे नाही. तात्पर्य जोपर्यंत "माझे शरीर कायम रहावे, मला सुख-आराम मिळत रहावा" अशा प्रकारचे विचार अहंतेत राहतील, तोपर्यंत बाहेरुन आचरणात येणारे दैवी-संपत्तीचे गुण मुक्तीदायक होणार नाहीत. मात्र एवढे होऊ शकते की, ते गुण त्याला शुभ फल देणारे होतील, उच्चलोक प्राप्त करून देणारे होतील.

ज्याप्रमाणे बीजाला मातीत मिसळल्यावर, माती, पाणी, वायू आणि ऊन, हे सर्व त्या बीजालाच पुष्ट करतात. आकाशही त्याला अवकाश देते. बीजापासून त्याच जातीचा वृक्ष उत्पन्न होतो आणि त्या वृक्षाला त्याच जातीची फळे लागतात. त्याचप्रमाणे अहंतेमध्ये (मी-पणा) मध्ये संसाराचे संस्काररूपी बीज ठेवून जे शुभ कर्म कराल, ते शुभ कर्म त्या बीजांनाच पुष्ट करील आणि त्या बीजानुसारच फळ देईल. तात्पर्य, सकाम मनुष्याच्या अहंतेत संसाराचे जे संस्कार पडलेले आहेत, त्या संस्कारानुसार त्याच्या सकाम साधनेमुळे अणिमा, गरिमा, इत्यादी सिद्धी प्राप्त होतील. त्यात आणखी काही विशेषता आल्यास तो ब्रह्मलोक इत्यादी लोकात जाऊन तेथील उच्च भोग प्राप्त करेल, परंतु त्याची मुक्ती होणार नाही (८।१६)

आता प्रश्न असा उठतो की, मनुष्याने मुक्तीसाठी काय करावे? त्याचे उत्तर असे आहे की, जसे बीज भाजले असता अथवा उकडले असता, ते बीज अंकुरित होत नाही.* त्या बीजाला पेरले गेले तर पृथ्वी त्याला आपल्याशी मिसळून घेईल. नंतर त्याचा पत्ताही लागणार नाही की, येथे बीज होते की नव्हते! त्याचप्रमाणे जेव्हा मनुष्याचा दृढ निश्चय होईल की, मला केवळ परमात्मप्राप्तीच करून घ्यावयाची आहे, तर संसाराची सर्व बीजे (संस्कार) अहंतेतून नष्ट होतील.

शरीर-प्राणामध्ये एक प्रकारची आसक्ती असते की, मी सुखपूर्वक जिवंत रहावे, मला मान-सन्मान मिळत रहावा, मी भोग भोगत रहावे इत्यादी. अशा प्रकारे जे व्यक्तित्वाशीच एकरूप होऊन राहतात, त्यांच्यात उत्तम गुण आले तरी ह्या आसक्तीमुळे त्यांची मुक्ती होऊ शकत नाही, कारण उच्च-नीच योनीत जन्म घेण्याला कारण प्रकृतीचा संबंधच आहे (१३।२१). तात्पर्य ज्याने प्रकृतीशी आपला संबंध जोडलेला आहे, तो शुभ कर्म करून ब्रह्मलोकापर्यंत जरी गेला तरीही तो बंधनातच राहील.

**मार्मिक गोष्ट**

भगवंतांनी या अध्यायामध्ये आसुरी-संपत्तीची तीन फले सांगितली आहेत ज्यापैकी या श्लोकात "**निबंधायासुरी मता**" पदाने बंधनरूपी सामान्य फल सांगितले. दुसऱ्या अध्यायाच्या एक्केचाळीसाव्यापासून चव्वेचाळीसाव्या श्लोकांमध्ये वर्णित सकाम उपासकही येतात. ज्यांचा उद्देश केवळ भोग भोगणे आणि संग्रह करणे आहे, अशा मनुष्यांची बुद्धी अनंत शाखांनी युक्त असते अर्थात् त्यांच्या कामनेला काही अंत नसतो. जे कामनेमध्ये तन्मय आहेत आणि कर्मफलाची प्रशंसा करणाऱ्या वेदवाक्यातच प्रीती ठेवतात, ते वैदिक यज्ञादींना विधी विधानाने करतात, परंतु कामनेमुळे त्यांना जन्ममरणरूपी बंधन प्राप्त होते (२।४१-४४). त्याचप्रमाणे जे ऐहिक भोगांची इच्छा न ठेवता स्वर्गीय दिव्य भोगांच्या कामनेने शास्त्रविहित यज्ञ करतात, ते यज्ञाचे फलस्वरूप (स्वर्गाचे प्रतिबंधक पाप नष्ट झाल्यामुळे) स्वर्गात जाऊन दिव्य भोग भोगतात. जेव्हा त्यांचे (स्वर्ग देणारे) पुण्य क्षीण होते, तेव्हा ते तेथून परत येऊन जन्म-मरणरूपी चक्रात सापडतात (९।२०-२१)

आता येथे शंका येते की, ज्या कृष्णमार्गाने (८।२५) उपर्युक्त सकाम पुरुष जातात त्याच मार्गाने योगभ्रष्ट पुरुष (६।४१) सुद्धा जातात. म्हणून दोघांचा मार्ग एक झाल्याने आणि दोन्ही पुनरावर्ती असल्याने सकाम पुरुषाप्रमाणे योगभ्रष्ट पुरुषांनाही "**निबंधायासुरी मता**" असणारे बंधन असले पाहिजे. याचे समाधान असे आहे की, योगभ्रष्टांना हे बंधन नसते. कारण पूर्व (मनुष्यजन्मात केलेल्या) साधनेत त्यांचा उद्देश स्वत:च्या कल्याणाचा राहिला आहे आणि अंतसमयी वासना, बेशुद्धी, पीडा इत्यादी कारणामुळे त्यांना विघ्नरूपाने स्वर्गादीत जावे लागते. म्हणून या योगभ्रष्टांच्या या मार्गाने जाण्यामुळेच (८।२५ मध्ये) सकाम पुरुषांनाही योगी पद आले आहे, नाहीतर सकाम पुरुष योगी म्हटले जाऊ शकत नाहीत.

आसुरी-संपत्तीचे दुसरे फल "**पतन्ति नरकेऽशुचौ**" आहे (१६।१६). जे कामनेला वश होऊन पाप, अन्याय, दुराचार इत्यादी करतात, त्यांना फलरूपाने स्थान विशेष नरकांची प्राप्ती होते.

आसुरी संपत्तीचे तीसरे फल आहे—"**आसुरीष्वेव**

* भर्जिता क्वथिता धाना प्रायो बीजाय नेष्यते॥ (श्रीमद्भा० १०।२२।२६)

**योनिषु**'',''**ततो यान्त्यधमां गतिम्**'' (१६।१९—२०), ज्यांच्या अंतःकरणात दुर्गुण-दुर्भाव राहतात आणि कधी कधी त्याला प्रेरित होऊन ते दुराचारही करतात. त्यांना दुर्गुण-दुर्भाव यानुसार प्रथम तर आसुरी योनीची प्राप्ती आणि नंतर दुराचारानुसार अधमगती (नरक) ची प्राप्ती सांगितली आहे.

**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव**—केवळ अविनाशी परमात्म्याच्या इच्छुकांची दैवी-संपत्ती असते, त्यामुळे मुक्ती मिळते आणि विनाशी संसाराचे भोग आणि संग्रहाच्या इच्छुकांची आसुरी-संपत्ती असते, त्यामुळे बंधन होते. ही गोष्ट ऐकून अर्जुनाच्या मनात कदाचित् अशी शंका उत्पन्न होऊ नये की, मला तर माझ्यात दैवी-संपत्ती दिसतच नाही. म्हणून भगवान् अर्जुनाला म्हणतात की, ''अरे बाबा! तू दैवी संपत्तीला प्राप्त झाला आहेस म्हणून तू शोक-संदेह करू नको.''

दैवी-संपत्ती प्राप्त झाल्यावर साधकाकडून कर्मयोग, ज्ञानयोग अथवा भक्तियोगाचे साधन स्वाभाविकच होत असते. कर्तव्य पालनाने कर्मयोग्याची आणि ज्ञानाग्नीने ज्ञान-योग्याची सर्व पापे नष्ट होतात (४।२३—३७) परंतु भक्ति-योग्याची सर्व पापे भगवान् नष्ट करतात. (१८-६६) आणि त्याचा संसारातून उद्धार करतात. (१२।७)

**मा शुचः***—तीसऱ्या श्लोकात ''**भारत**'' चौथ्या श्लोकात ''**पार्थ**'' आणि या पाचव्या श्लोकात ''**पाण्डव**''- या तीन संबोधनाचा प्रयोग करून भगवान् अर्जुनाला उत्साहित करतात की, ''भारत! तुझा वंश फार श्रेष्ठ आहे, पार्थ! तू त्या मातेचा (पृथा) पुत्र आहेस, जी वैरभाव ठेवणाऱ्यांचीही सेवा करणारी आहे. पाण्डव! तू फार मोठा धर्मात्मा आणि श्रेष्ठ पिता (पाण्डू) यांचा पुत्र आहेस''. तात्पर्य वंश, माता आणि पिता या तिन्ही दृष्टीने तू श्रेष्ठ आहेस. म्हणून तुझ्यात दैवी संपत्ती स्वाभाविकच आहे. म्हणून तू शोक करू नको.

गीतेत दोन वेळा ''**मा शुचः**'' पद आले आहे. एक येथे आणि दुसरे अठराव्या अध्यायाच्या सहासष्टाव्या श्लोकात. या पदांचा दोन वेळ प्रयोग करून भगवान् अर्जुनाला समजावितात की, तू साधन आणि सिद्धी दोन्हींच्या-ही विषयात चिंता करू नको. साधनेच्या विषयात येथे हे आश्वासन दिले आहे की, तू दैवी-संपत्तीला प्राप्त झाला आहेस आणि सिद्धीच्या विषयात (१८।६६) हे आश्वासन दिले आहे की, मी तुला संपूर्ण पापापासून मुक्त करीन. तात्पर्य, साधकाला आपल्या साधनेत ज्या उणीवा दिसतात, त्यांना तर तो दूर करत असतो परंतु उणीवांच्या कारणाने त्याच्या अंतः-करणात नम्रतेबरोबर अशी एक निराशा वाटते की, माझ्यात असे चांगले गुण कोठे आहेत की, त्यामुळे मला साध्य प्राप्त होईल? साधकाची ही निराशा नाहीशी करण्यासाठी भगवान् अर्जुनाला सर्व साधकांचा प्रतिनिधी बनवून आश्वासन देतात की, तू साधन आणि साध्याच्या विषयात चिंता-शोक करू नको, निराश होऊ नको.

दैवी-संपत्ती प्राप्त झालेल्या पुरुषांचा असा स्वभाव असतो की, त्यांच्यासमोर अनुकूल अथवा प्रतिकूल कोणतीही परिस्थिती, घटना येवो, त्यांची दृष्टी नेहमी आपल्या कल्याणाकडेच राहत असते. युद्धाच्या वेळी जेव्हा भगवंतांनी अर्जुनाचा रथ दोन्ही सैन्यामध्ये उभा केला, तेव्हा सैन्यामध्ये उभे असलेल्या आपल्या कुटुंबियांना पाहून अर्जुनाच्या मनात कुटुंबाचा स्नेहरूपी मोह उत्पन्न झाला आणि ते करुणा तसेच शोकाने व्याकूळ होऊन युद्धरूप कर्तव्यापासून च्युत होऊ लागले. त्यांच्या मनात असा विचार आला की, युद्धात कुटुंबियांना मारण्याने मला पापच लागेल, त्यामुळे माझ्या कल्याणात बाधा येईल. यांना मारण्याने आम्हास नाशवंत राज्य आणि सुख यांची तर प्राप्ती होईल पण त्यामुळे श्रेयाची (कल्याण) प्राप्ती दुरावेल. अशा प्रकारे अर्जुनामध्ये कुटुंबाचा मोह आणि पापाचे (अधर्म) भय दोन्ही एकाच वेळी येतात. त्यात कुटुंबाचा जो मोह आहे ती आसुरी-संपत्ती आहे आणि पापामुळे आपल्या कल्याणात बाधा येण्याचे जे भय आहे, ती दैवी-संपत्ती आहे.

यातही एक विशेष गोष्ट, अर्जुन म्हणातात की, आम्ही जो युद्ध करण्याचा निश्चय केला आहे हेही एक महान पाप आहे—''**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्**'' (१।४५). ते युद्धक्षेत्रातही भगवंतांना वारंवार आपल्या कल्याणाविषयी विचारतात-''**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**'' (२।७), ''**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्**'' (३।२), **यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्** (५।१). हे त्यांच्यात दैवी-संपत्ती असल्याचेच द्योतक आहे. या उलट ज्यांच्यात आसुरी संपत्ती आहे अशा दुर्योधन इत्यादीमध्ये राज्य आणि धनाचा इतका लोभ आहे की, ते कुटुंबाच्या नाशजन्य पापाकडे पहायला तयारच नाहीत (१।३८). अशा प्रकारे अर्जुनामध्ये आरंभापासूनच दैवी-संपत्ती होती. मोहरूप आसुरी-संपत्ती तर त्यांच्यात आगंतुक आली होती, ती नंतर भगवंताच्या कृपेने नष्ट झाली ''**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत**'' (१८। ७३). म्हणून

* येथे ''मा शुचः'' क्रिया पद दिवादिगणाच्या ''शुचिर् पूतीभावे'' धातूचे लुङ् लकाराचे रूप आहे.

येथे भगवान् अर्जुनाला म्हणतात की "अरे बाबा! तू चिंता करू नको कारण तू दैवी-संपत्तीला प्राप्त आहेस."

अर्जुनाला आपल्यामध्ये दैवी-संपत्ती दिसत नाही म्हणून भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तुझ्यात दैवी-संपत्ती प्रगट आहे. कारण जे श्रेष्ठ पुरुष असतात त्यांना आपल्यात चांगले गुण दिसत नाहीत आणि अवगुण त्यांच्यात राहत नाहीत. आपल्यात गुण न दिसण्याचे कारण हे आहे की, त्यांची गुणांशी अभिन्नता होत असते. जसे डोळ्यात घातलेले अंजन डोळ्याला दिसत नाही कारण ते डोळ्याशी एक होऊन जाते, त्याचप्रमाणे दैवी-संपत्तीशी अभिन्नता झाल्यामुळे गुण दिसत नाहीत. जोपर्यंत आपल्यात गुण दिसतात तोपर्यंत गुणाशी एकता झालेली नसते. जेव्हा गुण आपल्यापासून दूर असतात तेव्हाच दिसतात. म्हणून भगवान् अर्जुनाला आश्वासन देतात की, जरी तुला तुझ्यात दैवी-संपत्ती दिसत नसली तरी ती तुझ्यात स्वाभाविकच आहे, म्हणून तू चिंता करू नको.

## मार्मिक गोष्ट

भगवंतांनी कृपा करून मानवशरीर दिले आहे तर त्याला सफल करण्यासाठी आपल्या भावाकडे आणि आचरणाकडे विशेष लक्ष ठेवले पाहिजे. कारण शरीराचा काही भरवसा नाही की, केव्हा प्राण जाईल! अशा अवस्थेत लवकरात लवकर आपला उद्धार करण्यासाठी दैवी-संपत्तीचा आश्रय आणि आसुरी-संपत्तीचा त्याग करणे फार आवश्यक आहे.

दैवी-संपत्तीत "देव" शब्द परमात्म्याचा वाचक आहे आणि त्यांची संपत्ती "दैवी-संपत्ती" म्हटली जाते "**देवस्येयं दैवी**". परमात्म्याचाच अंश असल्याने जीवामध्ये दैवी-संपत्ती स्वाभाविकच आहे. जेव्हा जीव आपल्या अंशी परमात्म्यापासून विमुख होऊन जड प्रकृतीशी सम्मुख होतो अर्थात् उत्पत्ति-विनाशशील शरीरादी पदार्थांचा संग (तादात्म्य) करतो, तेव्हा त्याच्यात आसुरी-संपत्ती येते. कारण काम, क्रोध, लोभ, मोह, दंभ, द्वेष इत्यादी जितके काही दुर्गुण-दुराचार आहेत, ते सर्वचे सर्व नाशवानाच्या संगानेच उत्पन्न होतात. जे प्राणांना कायम ठेवू इच्छितात, प्राणाविषयीच ज्यांची प्रियता आहे, अशा प्राणपोषणपरायण लोकांचे वाचक "**असुर**" शब्द आहे—"**असुषु प्राणेषु रमन्ते इति असुराः**" म्हणून "मी सुखपूर्वक जिवंत रहावे" ही इच्छा आसुरी-संपत्तीचे मुख्य लक्षण आहे.

दैवी आणि आसुरी-संपत्ती सर्व प्राण्यात आढळून येते (१६।६) असा कोणीही साधारण प्राणी नाही की, ज्याच्यात ह्या दोन्ही संपत्ती नसतील. मात्र, यातही जीवन्मुक्त तत्त्वज्ञ महापुरुष तर संपूर्णपणे आसुरी-संपत्तीरहित असतात*. परंतु दैवी-संपत्तीरहित कधी कोणीही असू शकत नाही. कारण जीव "देव" अर्थात् परमात्म्याचा अंश आहे. परमात्म्याचा अंश असल्याने याच्यात दैवी-संपत्ती राहतच असते. आसुरी-संपत्तीची मुख्यता झाल्याने दैवी-संपत्ती दबल्यासारखी होते, समाप्त होत नाही. कारण सत् वस्तू कधी समाप्त होऊ शकत नाही. म्हणून कोणताही मनुष्य संपूर्णपणे दुर्गुण-दुराचारी असू शकत नाही, सर्वथा निर्दयी राहू शकत नाही, सर्वथा असत्यवादी असू शकत नाही आणि सर्वथा व्यभिचारी असू शकत नाही. जितके काही दुर्गुण-दुराचार आहेत ते कोणत्याही एका व्यक्तीत संपूर्णपणे असू शकत नाहीत. कोणीही, कितीही, कसाही दुर्गुणी-दुराचारी का असेना, त्याच्यात अंशिक सद्गुण-सदाचार राहतातच. दैवी-संपत्ती प्रगट झाल्यावर आसुरी-संपत्ती समाप्त होते, कारण दैवी-संपत्ती परमात्म्याची असल्याने अविनाशी आहे आणि आसुरी-संपत्ती संसाराची असल्याने नाशवन् आहे.

सच्चिदानंद स्वरूप परमात्म्याचा अंश असल्याने "मी नेहमी जिवंत रहावे अर्थात् कधी मरू नये, मी सर्व काही जाणून घ्यावे अर्थात् कधी अज्ञानी राहू नये, मी सर्वदा सुखी रहावे अर्थात् कधी दुःखी होऊ नये"—अशा प्रकारे सत्-चित्-आनंदाची इच्छा प्राणीमात्रात राहत असते. परंतु त्याच्याकडून ही चूक होते की, "मी अमर रहावे तर शरीरासह, ज्ञानी व्हावे तर बुद्धीद्वारा, मी सुखी व्हावे तर इंद्रिये आणि शरीराच्या माध्यमातून"—अशा प्रकारे या इच्छांना नाशवान् संसाराकडूनच पूर्ण करू इच्छितो. अशा रीतीने प्राणांचा मोह झाल्याने आसुरी-संपत्ती राहतच असते.† यात एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, प्राण्यामध्ये नित्य-निरंतर राहण्याची इच्छा असेल तर तो नित्य-निरंतर राहू शकतो आणि मी मरू नये अशी इच्छा होत असेल तर तो मरत नाही. जिवंत राहणे चांगले वाटते तर जिवंत राहणे याचे स्वाभाविक आहे आणि मरण्याची भीती वाटते तर मरणे याचे स्वाभाविक नाही.

* जीवन्मुक्त महापुरुष नाशवानापासून असंग होऊन अविनाशी परमात्म्यात स्थित होतात. म्हणून त्यांच्यात जगण्याची आशा आणि मरणाची भीती नसते. सत्स्वरूप परमात्म्यात स्थित असल्याने त्यांचे ठिकाणी सद्गुण-सदाचार स्वतः स्वाभाविक असतात. ते सिद्ध महापुरुष तर दैवी-संपत्तीच्याही पलीकडे गेलेले असतात. म्हणून त्यांच्या ठिकाणी दैवी-संपत्तीचे गुण स्वाभाविक असतात, जे साधकांसाठी आदर्श असतात.

† देहाभिमानात "मी सुखाने जिवंत रहावे" अशा प्रकारे प्राणांचा मोह राहतो. म्हणून देहाभिमानापासून आसुरी-संपत्ती उत्पन्न होते. म्हणून गीतेमध्ये "देहवद्भिः" (१२।५), "देहिनम्" (३।४०, १४।५, ७) इत्यादी पदांनी ज्या देहाभिमान्याविषयी सांगितले आहे, ते सर्व आसुरी-संपत्तीच्याच अंतर्गत समजले पाहिजे.

तसेच अज्ञान आवडत नाही तर अज्ञान याचे साथी नाही. दु:ख नकोसे वाटते तर दु:ख याचे साथी नाही. यावरुन सिद्ध होते की, याचे स्वरूप ''सत्'' आहे. ''असत्'' याचे स्वरूप नाही. सत् स्वरूप असूनही हा सत्‌ची का इच्छा करतो? कारण याने नष्ट होणाऱ्या असत् शरीरादीला ''मी'' आणि ''माझे'' मानले आहे आणि त्यांच्यात आसक्त झाला आहे. तात्पर्य, असत्‌चा स्वीकार केल्याने स्वत: सत् असूनही सत्‌ची इच्छा होते. जडतेचा स्वीकार केल्याने स्वत: ज्ञानरूप असूनही ज्ञानाची इच्छा होते. दु:खरूप संसाराचा स्वीकार केल्याने स्वत: सुखस्वरूप असूनही सुखाची इच्छा होते. परंतु त्याची पूर्तीसुद्धा असत् जड दु:खरूप संसाराकडूनच करू इच्छितो. तादात्म्यामुळे हा शरीराला कायम ठेवू इच्छितो, बुद्धीनेच ज्ञानी होऊ इच्छितो, शरीरानेच श्रेष्ठ आणि सुखी होऊ इच्छितो, आपल्या नाव आणि रूपालाच स्थायी ठेवू इच्छितो. आपल्या नावाला मृत्यूनंतरही स्थायी ठेवू इच्छितो. अशा प्रकारे असत्‌च्या संगाने आसुरी-संपत्ती येते. त्याचप्रमाणे असत्‌च्या संगाचा त्याग केल्यास आसुरी-संपत्ती समाप्त होते आणि दैवी-संपत्ती प्रकट होते.

जेव्हा सत्संग, स्वाध्याय, इत्यादीद्वारा मनुष्याला परमात्मप्राप्तीचा विचार येतो तेव्हा तो त्यासाठी दैवी-संपत्ती धारण करू इच्छितो. तो दैवी-संपत्ती कर्तव्यरूपाने प्राप्त करून घेतो की, मला सत्यवादी, अहिंसक आणि दयाळू व्हावयाचे आहे इत्यादी. अशा प्रकारे जितके काही दैवी-संपत्तीचे गुण आहेत, त्या सर्वांना आपल्या शक्तीने प्राप्त करू इच्छितो. कर्तव्यरूपाने प्राप्त केलेली आणि आपल्या शक्तीने (पुरुषार्थ) प्राप्त केलेली वस्तू स्वाभाविक नसते, तर कृत्रिम असते—असा सिद्धांत आहे. याशिवाय आपल्या पुरुषार्थाने प्राप्त झाली असे मानल्यामुळे अभिमान येतो की, मी फार सत्यभाषी आहे, मी फार सज्जन आहे इत्यादी, जितके काही दुर्गुण-दुराचार असतात, सर्वचे सर्व अभिमानाच्या छायेत राहतात आणि अभिमानानेच पुष्ट होतात. म्हणून आपल्या प्रयत्नाने केलेली जितकी काही साधने आहेत त्या साधनेत अहंकार जसाच्या तसा राहतो आणि अहंकारात आसुरी-संपत्ती राहते. म्हणून तो, जोपर्यंत दैवी-संपत्तीसाठी प्रयत्न करतो तोपर्यंत आसुरी-संपत्ती सुटत नाही. शेवटी तो आपला पराजय मान्य करतो अथवा त्याचा उत्साह कमी होतो, त्याचा प्रयत्न मंद होतो आणि असे मानतो की, ही आपल्या आटोक्यातील गोष्ट नाही. साधकाची अशी अवस्था का होते? कारण त्याने आत्तापर्यंत हे जाणून घेतले नाही की, आसुरी-संपत्ती माझ्यात कशी आली? आसुरी-संपत्तीचे कारण नाशवानाचा संग आहे. याचा संग जोपर्यंत राहील तोपर्यंत आसुरी-संपत्ती राहणारच. तो नाशवानाच्या संगाचा त्याग करत नाही, तर आसुरी-संपत्ती याला सोडीत नाही अर्थात् तो आसुरी-संपत्तीपासून सर्वथा रहित होऊ शकत नाही. म्हणून जर त्याला दैवी-संपत्ती प्राप्त करण्याची इच्छा असेल तर त्याने नाशवान् जडाच्या संगाचा त्याग केला पाहिजे. नाशवानाच्या संगाचा त्याग झाल्यावर दैवी-संपत्ती आपोआप प्रकट होईल. कारण परमात्म्याचा अंश असल्याने परमात्म्याची संपत्ती त्याच्यात स्वत:सिद्ध आहे. कर्तव्यरूपाने प्राप्त करावयाची नाही.

यात आणखी एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, दैवी-संपत्तीचे गुण स्वत: स्वाभाविक राहतात. त्यांचा कोणी त्याग करू शकत नाही. हे कसे कळू शकेल? जसा एखाद्याने विचार केला की, मी सत्यच बोलेल तर तो आयुष्यभर सत्य बोलू शकतो. परंतु एखादा असे म्हणेल की, मी असत्यच बोलेल तर आठ प्रहरही असत्य बोलू शकणार नाही. सत्यच बोलण्याचा निश्चय झाल्यास तो दु:ख भोगू शकतो पण असत्य बोलण्यासाठी तो बाध्य होऊ शकत नाही. परंतु असत्यच बोलेल असा विचार झाल्यास त्याला खाणे-पिणे, बोलणे-चालणे इत्यादी व्यवहार करणेही कठीण होईल. भूक लागली आहे आणि असत्य बोलेल की भूक नाही, तर त्याला जगणे अशक्य होईल. जर त्याने अशी प्रतिज्ञा केली की, असत्य बोलण्याने मरण आले तरी चालेल, पण असत्यच बोलेन तर त्याची प्रतिज्ञा सत्य होईल. म्हणून एक तर प्रतिज्ञा भंग झाली तर सत्य येईल अथवा प्रतिज्ञा सत्य होईल. सत्य कधी सुटणार नाही. कारण सत्य मनुष्यमात्रामध्ये स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणे दैवी-संपत्तीचे जितके काही गुण आहेत सर्वांच्या विषयात तशीच गोष्ट आहे. ते तर नित्य राहणारे आणि स्वाभाविक आहेत. केवळ नाशवानाच्या संगाचा त्याग करावयाचा आहे. नाशवानाचा संग अनित्य आणि अस्वभाविक आहे.

आसुरी-संपत्ती आगंतुक आहे. दुर्गुण-दुराचार तर बिल्कुलच आगंतुक आहेत. एखादा माणूस प्रसन्न राहत असेल तर त्याला लोक ''प्रसन्न का राहतोस?'' असे विचारत नाहीत. परंतु एखादा दु:खी असेल तर त्याला ''दु:खी का आहेस.?'' असे विचारतात कारण प्रसन्नता स्वाभाविक आहे आणि दु:ख अस्वाभाविक (आगंतुक) आहे. म्हणून सदाचरणाने वागणाऱ्याला, ''तुम्ही चांगले आचरण का करता?'' असे कोणी म्हणत नाही परंतु दुराचरणी माणसाला सर्व जन, ''तुम्ही दुराचरण का करता?'' असे विचारतात,

म्हणून सदगुण-सदाचार स्वाभाविक असतात आणि दुर्गुण-दुराचार संगामुळे येतात, म्हणून आगंतुक आहेत.

अर्जुनामध्ये दैवी-संपत्ती विशेषत्वाने होती. जेव्हा त्यांच्यात भित्रेपणा आला, तेव्हा भगवंतांनी आश्चर्याने म्हटले की, ''तुझ्यात हा भित्रेपणा कोठून आला?'' (२।२-३) तात्पर्य, अर्जुनात हा दोष स्वाभाविक नव्हता, आगंतुक आला होता. पूर्वी त्यांच्यात हा दोष नव्हता. अर्जुन पुढे म्हणतात की, ''ज्यामुळे माझे निश्चित कल्याण होईल असा विचार सांगा'' (२।७; ३।२; ५।१). युद्धाच्या प्रसंगातही अर्जुनामध्ये ''माझे कल्याण व्हावे'' ही इच्छा आहे. तर यावरुन अर्जुनात पूर्वीपासूनच दैवी संपत्ती होती, असे सिद्ध होते. नाही तर उर्वशीसारख्या अप्सरेलाही ठोकरून लावणे ही काही सामान्य माणसाची गोष्ट नाही. ते अर्जुन विचार करतात की, मला दैवी-संपत्ती प्राप्त आहे की नाही? मी त्याचा अधिकारी आहे की नाही? म्हणून त्यांना आश्वासन देताना भगवान् म्हणतात की, तू शोक करू नकोस, तू दैवी-संपत्तीला प्राप्त झाला आहेस— ''**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव**'' (१६।५)

सत् (चेतन) आणि असत् (जड) यांच्या तादात्म्यातून अहंभाव उत्पन्न होतो. मनुष्य शुभ अथवा अशुभ कोणतेही काम करो, ते आपल्या अहंतेच्या अनुषंगानेच करतो. जेव्हा तो परमात्म्याकडे अग्रेसर होतो, तेव्हा त्याच्या अहंतेत सत्-अंशाची मुख्यता राहते आणि जेव्हा संसाराकडे वळतो, तेव्हा त्याच्या अहंतेत नाशवान् असत् अंशाची मुख्यता असते. सत्-अंशाची मुख्यता असल्याने तो दैवी-संपत्तीचा अधिकारी म्हटला जातो आणि असत् अंशाची मुख्यता असल्याने तो दैवी-संपत्तीचा अनधिकारी म्हटला जातो. असत् अंशाला समाप्त करण्यासाठीच मानवशरीर मिळाले आहे. म्हणून मनुष्य निर्बल नाही, पराधीन नाही, तर हा सर्वथा सबल आहे, स्वाधीन आहे. नाशवान् असत् अंश तर सर्वांचा नष्ट होतच आहे, परंतु तो त्याच्याशी संबंध कायम ठेवतो ही चूक होते. नाशवानाशी संबंध कायम ठेवल्याने आसुरी-संपत्तीचा सर्वथा अभाव होत नाही.

अहंभाव नाशवान् असत्च्या संबंधानेच होतो. असत्-चा संबंध समाप्त होताच अहंभाव नष्ट होतो. प्रकृतीच्या अंशाला पकडल्यानेच अहंभाव येतो. अहम्मध्ये जड-चेतन दोन्हीही आहेत. तादात्म्य झाल्याने पुरुषाने (चेतन) जडाशी आपले एकत्व मानले आहे. भोग पदार्थांच्या सर्व इच्छा असत् अंशातच राहतात. परंतु सुख-दुःखाच्या भोक्तेपणात पुरुष हेतू बनतो-''**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते**'' (१३।२०) वास्तविक हेतू नसतोच कारण तो प्रकृतिस्थ झाल्यानेच भोक्ता बनतो—''**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते**'' (१३।२१) म्हणून सुख-दुःखरूप जो विकार होतो, तो मुख्यत्वाने जड अंशातच होतो परंतु तादात्म्य असल्याने त्याचा परिणाम ज्ञात्या चेतनावर होतो की, मी सुखी आहे. दुःखी आहे, जसे विवाह झाल्यावर पत्नीची जी आवश्यकता असते ती आपलीच म्हटली जाते. पुरुष जो दागिने खरेदी करतो तो पत्नीच्या संबंधानेच (पत्नीसाठी) खरेदी करतो. नाहीतर त्याला आपल्यासाठी अलंकार इत्यादींची आवश्यकता नसते. त्याचप्रमाणे जड अंशाच्या संबंधानेच चेतनात जडाची इच्छा आणि जडाचा भोग होतो. जडाचा भोग जड अंशातच होतो. परंतु जडाशी तादात्म्य झाल्याने भोगाचा परिणाम केवळ जडात होऊ शकत नाही अर्थात् सुख-दुःखाचा भोक्ता केवळ जड अंश होऊ शकत नाही. परिणामाचा ज्ञाता चेतनच भोक्ता बनतो. जितक्या काही क्रिया होतात त्या सर्व प्रकृतीत होतात (३।२७; १३।२९) परंतु तादात्म्यामुळे चेतन त्यांना आपल्यात मानतो की, मी कर्ता आहे. तादात्म्यात चेतनाच्या (परमात्मा) इच्छेत चेतनाची मुख्यता आणि जडाच्या (संसार) इच्छेत जडाची मुख्यता राहते. जेव्हा चेतनाची मुख्यता राहते, तेव्हा दैवी-संपत्ती येते आणि जेव्हा जडाची मुख्यता राहते, तेव्हा आसुरी-संपत्ती येते. जडाशी तादात्म्य झाले असले तरी सत्, चित् आणि आनंदाची इच्छा चेतनातच राहते. संसाराची अशी कोणतीच इच्छा नाही, जी या तीन इच्छेत (सदा राहणे, सर्व काही जाणणे आणि सदा सुखी राहणे) सम्मिलित नसेल. त्याच्याकडून चूक ही होते की, तो या इच्छांची पूर्ती जडाद्वारा (संसार) करू इच्छितो.

जडाचा आणि आसुरी-संपत्तीचा स्वीकार स्वतः चेतनाने (स्व) केला आहे. जडात अशी शक्ती नाही की, ते स्वबरोबर स्थिर राहील. जडात तर नेहमी परिवर्तन होत असते. चेतनाने जर त्याला पकडले नाही तर ते आपोआप सुटून जाईल. चेतनात कधी विकार होत नाही. ते सदा जसेच्या तसे राहते. परंतु असत् प्रकृती नित्य-निरंतर, सदा बदलत राहते. ती कधी एकरूप राहू शकत नाही. चेतनाने प्रकृतीशी संबंध स्वीकार केला आहे. त्या संबंधाची सत्ता हा ''मी'' आणि ''माझे'' रूपाने स्वीकार करतो. म्हणून जडाचा संबंध आणि त्यामुळे उत्पन्न होणारी आसुरी-संपत्ती आगंतुक आहे. जर ती स्व मध्ये असती तर तिचा कधी नाश झाला नसता. कारण स्व कधी नाश पावत नाही आणि आसुरी-संपत्तीच्या त्यागाचा प्रश्नच उद्भवला नसता. अनित्य असूनही चेतनाच्या संबंधामुळे ती नित्य दिसू लागते. अविनाशीच्या संबंधामुळे विनाशीही अविनाशीप्रमाणे दिसू लागते. म्हणून ज्या मनुष्यात आसुरी-संपत्ती असते, तो

आसुरी-संपत्तीचा त्याग करू शकतो आणि कल्याणकारी आचरण करून परमात्म्याला प्राप्त होऊ शकतो. (१६।२२)

परमात्म्याच्या सम्मुख होताच आसुरी-संपत्ती समाप्त होऊ लागते—

**सनमुख होई जीव मोहि जबहिं।**
**जन्म कोटि अघ नासहिं तबहीं॥**

(मानस ५।४४।१)

कारण "जन्म कोटि अघ" प्रकृतीशी संबंध स्वीकारल्यानेच झाले आहेत. प्रकृतीचा स्वीकार न केला तर जन्म-मरण कसे होईल? जन्म-मरणाला कारण प्रकृतीशी संबंध हेच आहे. "**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (१३।२१) परंतु जीवात्मा प्रकृतीच्या क्रियेला आपल्यात मानतो आणि प्रकृतीचे कार्य शरीराविषयी "मी" "माझे" पण करतो, त्यामुळे तो जन्मत-मरत राहतो. वास्तविक हा कर्ताही नाही आणि लिप्तही नाही "**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**" (१३।३१) या वास्तविकतेचा अनुभव करणे हेच "कर्मात अकर्म" तसेच "अकर्मात कर्म" पाहणे आहे. या दोन्ही गोष्टींचा अभिप्राय कर्म करतानाही हा सर्वथा निर्लिप्त तसेच अकर्ता आहे आणि निर्लिप्त तसेच अकर्ता असूनही हा कर्म करतो अर्थात् कर्म करीत असताना आणि कर्म करीत नसताना हा (आत्मा) नित्य-निरंतर निर्लिप्त तसेच अकर्ता राहतो. या वास्तविकतेचा अनुभव करणाराच मनुष्यामध्ये बुद्धिमान् आहे (४।१८) जर कर्तेपणाचा भाव नसेल आणि ज्याच्या बुद्धीत लिप्तता नसेल अर्थात् कोणतीही कामना नसेल, त्याने जरी सर्व प्राण्यांना ठार केले तरीही त्याला पाप लागणार नाही (१८।१७). अर्जुनाने विचारले होते की, मनुष्य कोणाच्या प्रेरणेने पाप करतो? तेव्हा भगवंतांनी उत्तरात म्हटले "कामनेने" (३।३६-३७). कामनेमुळेच सर्व पापे होतात. शरीराच्या तादात्म्याने भोग आणि संग्रहाची कामना होत असते.* म्हणून जडाचा संगच (महत्त्व) संपूर्ण पापाला आणि आसुरी-संपत्तीला कारण आहे. जडाचा संग नसेल तर दैवी-संपत्ती स्वत:सिद्ध आहे.

अर्जुन सर्व साधकांचे प्रतिनिधी आहेत. म्हणून भगवान् अर्जुनाच्या निमित्ताने सर्व साधकांना आश्वासन देत आहेत की, चिंता करू नका. आपल्यात आसुरी-संपत्ती दिसली तरी घाबरू नका. कारण तुमच्यात दैवी-संपत्ती स्वत:स्वाभाविक विद्यमान आहे—"**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव**" (१६।५).

तात्पर्य, साधकाने पारमार्थिक उन्नतीविषयी कधी निराश होऊ नये. कारण परमात्म्याचा अंश असल्याने मनुष्यमात्रात परमात्म्याची संपत्ती (दैवी-संपत्ती) राहतच असते. परमात्मप्राप्तीचाच उद्देश झाल्याने दैवी-संपत्ती आपोआप प्रकट होते.

परमात्म्याचा अंश असल्यामुळे साधकाने भगवत्प्राप्तीविषयी कधी निराश होऊ नये. कारण परमात्म्याने कृपा करून आपल्या प्राप्तीसाठीच मनुष्यशरीर दिले आहे. म्हणून परमात्म्याचा संकल्प तर आपल्या कल्याणाचाच आहे. जर आपण आपला कोणताही वेगळा संकल्प ठेवला नाही, उलट परमात्म्याच्या संकल्पातच आपला संकल्प समाविष्ट केला तर मग त्यांच्या कृपेने आपोआप कल्याण होतेच.

**परिशिष्ट भाव**—जीवाच्या एका बाजूला भगवान् आहेत आणि दुसऱ्या बाजूला संसार आहे. जेव्हा तो भगवंताकडे अग्रेसर होतो, तेव्हा त्याच्यात दैवी-संपत्ती उतरते आणि जेव्हा तो संसाराकडे अग्रेसर होतो, तेव्हा त्याच्यात आसुरी-संपत्ती प्रवेश करते. दैवी-संपत्तीत आस्तिक भाव राहतो आणि आसुरी-संपत्तीत नास्तिक भाव राहतो. जरी मुक्तीची सर्व साधने (कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग इत्यादी) दैवी-संपत्तीच्या अंतर्गत येतात—'**दैवीसम्पद्विमोक्षाय**', तरी दैवी-संपत्तीत मुख्यता भक्तीचीच आहे. म्हणूनच भगवंतांनी भक्तीच्या प्रकरणात म्हटले आहे—

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः। भजन्त्यनन्य मनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्॥** (गीता ९। १३)

'हे पृथानंदन! दैवी प्रकृतीचा आश्रय घेतलेले, अनन्यमन असणारे महात्मालोक मला संपूर्ण प्राण्यांचा आदी आणि अविनाशी समजून माझे भजन करतात.'

पुढेही भगवंताने म्हटले आहे—'**मामप्राप्यैव कौन्तेय—**' (१६। २०). भक्तीच्या अंतर्गत मुक्तीची सर्व साधने येतात. ज्यांना आपले प्राण प्रिय असतात आणि प्राणपोषणपरायण मनुष्य आसुरी-संपत्ती असणारे असतात. परंतु जे भगवंताला आपल्या प्राणापेक्षाही अधिक प्रिय मानतात ते दैवी-संपत्ती असणारे असतात.

* कोणताही मनुष्य दोषी म्हणून घेणे पसंत करीत नाही, कारण या लोकात दोषी माणसाचा अपमान, तिरस्कार आणि निंदा होते. तसेच परलोकात चौऱ्यांशी लाख योनी आणि नरक भोगावे लागतात. परंतु मनुष्य नाशवान् जडाच्या संगाने उत्पन्न झालेल्या कामनेला वशीभूत होऊन न करण्यायोग्य शास्त्र-निषिद्ध क्रिया करतो. म्हणून त्या क्रियेचा परिणाम कर्ता (मनुष्य) याच्या आवडी (मी निर्दोष रहावे) प्रमाणे होत नाही आणि कर्ता (अपल्या आवडीविरुद्ध) दोषी किंवा पापी होतो.

दुसऱ्यांच्या सुखासाठी कर्म करणे अथवा दुसऱ्यांचे सुख इच्छिणे 'चेतनता' आहे आणि आपल्या सुखासाठी कर्म करणे अथवा आपले सुख इच्छिणे 'जडता' आहे. भजन-ध्यानसुद्धा आपल्या सुखासाठी शरीराचा आराम, मान-आदर यासाठी करणे जडता आहे. चेतनाच्या मुख्यतेने दैवी-संपत्ती येते आणि जडतेच्या मुख्यतेने आसुरी-संपत्ती येते.

मूळ दोष एकच आहे, ज्यामुळे संपूर्ण आसुरी-संपत्ती उत्पन्न होते आणि मूळ गुणही एकच आहे, ज्यामुळे संपूर्ण दैवी-संपत्ती प्रकट होते. मूळ दोष आहे—शरीर आणि संसाराची सत्ता आणि महत्ता स्वीकार करून त्याच्याशी संबंध जोडणे. मूळ गुण आहे—भगवंताची सत्ता आणि महत्ता स्वीकार करून त्यांच्याशी संबंध जोडणे. हा मूळ दोष आणि मूळ गुण हाच स्थानभेदाने अनेक रूपात दिसतो.

जोपर्यंत गुणांबरोबर अवगुण राहतात तोपर्यंत गुणांचे महत्त्व दिसते आणि त्यांचा अभिमान होतो. कोणताही अवगुण राहणार नाही तर अभिमान होत नाही. अभिमान आसुरी-संपत्तीचे मूळ आहे. अभिमानामुळे मनुष्याला दुसऱ्यांपेक्षा आपल्यात विशेषता दिसू लागते—ही आसुरी-संपत्ती आहे. अभिमान झाल्यामुळे दैवी-संपत्ती सुद्धा आसुरी-संपत्तीची वृद्धी करणारी होते. जेव्हा गुणांबरोबर अवगुण राहत नाहीत, जेव्हा गुणांचे महत्त्व दिसत नाही आणि त्यांचा अभिमान होत नाही. गुणांचे महत्त्व न दिसल्यास साधकाची दृष्टी आपल्या गुणांकडे जात नाही, त्यामुळे तो घाबरून जातो.* आपल्या गुणांकडे दृष्टी न जाण्यानेच अर्जुन घाबरून जातात की, माझ्यात दैवी-संपत्ती नाहीच! अशा अवस्थेत त्यांची चिंता दूर करण्यासाठी भगवान् म्हणतात—'**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव.**'

***संबंध***—*संपूर्ण प्राण्यात चेतन आणि जड-दोन्ही अंश राहतात. त्यापैकी कित्येक प्राण्यांचे लक्ष्य जडतेला विमुख होऊन प्रामुख्याने चेतना (परमात्मा) चे असते आणि कित्येक प्राण्यांचे लक्ष्य चेतानाला विमुख होऊन प्रामुख्याने जडा (भोग आणि संग्रह) चे असते. अशा प्रकारे चेतन आणि जडाच्या मुख्यतेने प्राण्यांचे दोन भेद होतात. ते पुढील श्लोकात भगवान् सांगत आहेत.*

## द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च।
## दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु॥ ६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अस्मिन्** | = या- | **च** | = आणि | **पार्थ** | = हे पार्थ! (तू) |
| **लोके** | = लोकी | **आसुरः** | = आसुरी | **मे** | = माझ्याकडून |
| **द्वौ, एव** | = दोन प्रकारच्याच | **दैवः** | = दैवीला तर (मी) | **आसुरम्** | = आसुरीचे वर्णन (विस्ताराने) |
| **भूतसर्गौ** | = प्राण्यांची सृष्टी आहे— | **विस्तरशः** | = विस्ताराने | | |
| **दैवः** | = दैवी | **प्रोक्तः** | = सांगितले, (आता) | **शृणु** | = ऐक. |

*व्याख्या*— **द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च**—आसुरी-संपत्तीचे विस्तारपूर्वक वर्णन करण्यासाठी, त्याचा उपक्रम करताना भगवान् म्हणतात की, ह्या लोकामध्ये दोन प्रकारचा प्राणी समुदाय आहे. दैवी आणि आसुरी. तात्पर्य, प्राणीमात्रात परमात्मा आणि प्रकृती—दोन्हीचा अंश आहे. १०।३९; १८।४०) परमात्म्याचा अंश चेतन आहे आणि प्रकृतीचा अंश जड आहे. तो चेतन अंश जेव्हा परिवर्तनशील जडाशी सम्मुख होतो, तेव्हा त्याच्यात आसुरी-संपत्ती येते आणि जेव्हा तो जड प्रकृतीशी विमुख होऊन केवळ परमात्म्याशी सम्मुख होतो तेव्हा त्याच्यात दैवी-संपत्ती जागृत होते.

"देव" नाव परमात्म्याचे आहे. परमात्म्याच्या प्राप्तीसाठी जितके काही सद्गुण-सदाचार इत्यादी साधने आहेत, ती सर्व दैवी-संपत्ती आहे. जसे भगवान् नित्य आहेत, तसेच त्यांची साधन संपत्तीही नित्य आहे. भगवंतांनी परमात्मप्राप्तीच्या साधनांना "अव्यय" अर्थात् अविनाशी म्हटले आहे-"**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्**" (४। १)

**द्वौ भूतसर्गौ**—या मधील "भूत" शब्दाने मनुष्य, देवता, असुर, राक्षस, भूत, प्रेत, पिशाच, पशू, पक्षी, कीट, पतंग, वृक्ष, लता इत्यादी संपूर्ण स्थावर जंगम प्राणी घेतले जाऊ शकतात. परंतु आसुर स्वभावाचा त्याग करण्याची विवेकशक्ती प्रामुख्याने मनुष्यशरीरातच आहे. म्हणून मनुष्याने

* एक वेळ एक साधू फार व्याकूळ होऊन म्हणाले की, गीतेवर माझी श्रद्धा नाही, माझी काय दशा होईल! कारण भगवंताने म्हटले आहे—'अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति' (४। ४०). मी म्हणालो की, श्रद्धा न करणाऱ्याचा नाश होतो—असे कोठे लिहिले आहे? ते म्हणाले—गीतेत. मी म्हणालो की, गीतेत लिहिलेल्या गोष्टीने आपण घाबरलात तर ही गीतेवर श्रद्धा झाली नाही तर काय झाले? ही गोष्ट ऐकताच ते प्रसन्न झाले!

आसुर स्वभावाचा संपूर्णपणे त्याग केला पाहिजे. त्याचा त्याग होताच दैवी-संपत्ती आपोआप प्रकट होते.

मनुष्यामध्ये दैवी आणि आसुरी—दोन्ही संपत्ती असतात—

**सुमति कुमति सब कें उर रहहीं। नाथ पुरान निगम अस कहहीं॥**

(मानस ५।४०।३)

क्रूरातीक्रूर कसायातही दया राहत असते. चोरातल्या चोरातही सज्जनता असते. अशा प्रकारे दैवी-संपत्तीरहित कोणी असूच शकत नाही. कारण जीवमात्र परमात्म्याचा अंश आहे. त्याच्यात दैवी-संपत्ती स्वत: स्वाभाविक आहे आणि आसुरी-संपत्ती कृत्रिम आहे. शुद्ध अंत:करणाच्या भगवद्भक्त साधकास आसुरी-संपत्ती निरंतर खटकत राहते, त्याला ती आवडत नाही आणि तिला दूर करण्याचा प्रयत्नही तो करतो. परंतु जे लोक भजन-स्मरणाबरोबर आसुरी-संपत्तीचेही पोषण करतात अर्थात् काही भजन-स्मरण, नित्यकर्म इत्यादीही करतात आणि सांसारिक भोग आणि संग्रहातही सुख घेतात आणि त्याला आवश्यक समजतात, ते वास्तविक साधक समजले जाऊ शकत नाहीत. कारण काही दैवी स्वभाव व काही आसुरी स्वभाव तर नीचातीनीच प्राण्यातही असतो.

विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे की, अहंतेनुरूप प्रवृत्ती होत असते आणि प्रवृत्तीनुसार अहंता दृढ होत असते. ज्याच्या अहंतेत "मी सत्यवादी आहे" असा भाव असेल, तो सत्य बोलेल आणि सत्य बोलण्याने त्याची सत्यनिष्ठा दृढ होईल. मग तो कधी असत्य बोलू शकणार नाही. परंतु ज्याच्या अहंतेमध्ये "मी संसारी आहे आणि संसाराचे भोग भोगणे आणि संग्रह करणे माझे काम आहे" असा भाव असेल, त्याला असत्य-कपट करण्यास वेळ लागणार नाही. असत्य-कपट करण्याने त्याच्या अहंतेत हा भाव दृढ होतो की "असत्य-कपट केल्याशिवाय कोणाचेही काम चालूच शकत नाही, त्यातही आजकालच्या काळात हे करावेच लागते, यातून कोणी वाचू शकत नाही" इत्यादी. अशा प्रकारे अहंतेत दुर्भाव आल्यानेच दुराचारापासून सुटका होणे कठीण होते आणि याच कारणामुळे लोक दुर्गुण-दुराचारांना सोडणे कठीण अथवा असंभव मानतात.

परमात्म्याचा अंश असल्याने सद्भावरहित असा कोणी असू शकत नाही आणि शरीराशी अहंता ममता ठेवून संपूर्णपणे दुर्भावरहित कोणीही होऊ शकत नाही. दुर्भाव आले तरी सद्भावाचे बीज कधी नष्ट होत नाही, कारण सद्भाव "सत्" आहेत आणि सत्चा कधी नाश होत नाही. "**नाभावो विद्यते सत:**" (२।१६) या उलट दुर्भाव कुसंगाने उत्पन्न होणारे आहेत आणि उत्पन्न होणारी वस्तू नित्य नसते "**नासतो विद्यते भाव:**" (२।१६)

माणसांच्या सद्भाव अथवा दुर्भाव यांच्या प्रधानतेनेच प्रवृत्ती होत असते. जेव्हा सद्भावाची मुख्यता राहते तेव्हा तो सदाचार करतो आणि जेव्हा दुर्भावाची मुख्यता राहते, तेव्हा तो दुराचार करतो. तात्पर्य, ज्याचा उद्देश परमात्मप्राप्तीचा होतो त्यात सद्भावाची मुख्यता असते आणि दुर्भाव समाप्त होऊ लागतात आणि ज्याचा उद्देश सांसारिक भोग आणि संग्रह असतो, त्याच्यात दुर्भावाची मुख्यता राहते आणि सद्भाव दबून जातात.

**लोकेऽस्मिन्**—याचे तात्पर्य, नवनवीन अधिकार पृथ्वी मंडळावरच मिळतात. पृथ्वीमंडळापैकी भारत क्षेत्रात विलक्षण अधिकार प्राप्त होतात. भारतभूमीत जन्म घेणाऱ्या माणसांची प्रशंसा देवतांनीही केली आहे.* कल्याणाची संधी मनुष्यलोकातच आहे. या लोकात येऊन मनुष्याने विशेष सावध होऊन दैवी-संपत्ती जागृत करावी. भगवंतांनी विशेष कृपा करून हे मनुष्यशरीर दिले आहे-

**कबहुँक करि करुना नर देही। देत ईस बिनु हेतु सनेही॥**

(मानस ७।४४।३)

ज्या प्राण्यांना भगवान् मनुष्य बनवितात, त्यांच्यावर भगवान् विश्वास करतात की, हे आपले कल्याण (उद्धार) करतील. याच आशेने ते मनुष्यशरीर देतात. भगवंतांनी विशेष कृपा करून मनुष्याला आपल्या प्राप्तीची सामुग्री आणि योग्यता देऊन ठेवली आहे आणि विवेकही दिला आहे. म्हणून "**लोकेऽस्मिन्**" पदाने विशेषत: मनुष्याकडेच लक्ष वेधले आहे. परंतु भगवान् तर प्राणीमात्रात समानरूपाने राहतात-"**समोऽहं सर्वभूतेषु**" (९।२९) जेथे भगवान् राहतात, तेथे त्यांची संपत्तीही राहते. म्हणून '**भूतसर्गौ**' पद

* (१) अहो अमीषां किमकारि शोभनं प्रसन्न एषां स्विदुत स्वयं हरि:। यैर्जन्म लब्धं नृषु भारताजिरे मुकुन्दसेवौपयिकं स्पृहा हि न:॥

(श्रीमद्भा० ५।१९।२१)

"अहो! ज्या जीवांनी भारतवर्षात भगवंताच्या सेवेयोग्य मनुष्यजन्म प्राप्त केला आहे. त्यांनी असे कोणते पुण्य केले आहे? की, त्यांच्यावर स्वत: श्रीहरीच प्रसन्न झाले ह्या परम सौभाग्यासाठी तर आम्ही निरंतर झुरत असतो."

(२) गायन्ति देवा: किल गीतकानि धन्यास्तु ते भारतभूमिभागे। स्वर्गापवर्गास्पदमार्गभूते भवन्ति भूय: पुरुषा: सुरत्वात्॥ (श्रीविष्णुपुराण २।३।२४)

"देवगणही निरंतर असेच गान करीतात की, ज्यांनी स्वर्ग व अपवर्ग मार्गभूत भारतवर्षात जन्म घेतला आहे, ते पुरुष आम्हा देवतांपेक्षाही अधिक धन्य, भाग्यवान् आहेत."

दिले आहे. यावरुन हे सिद्ध झाले की, प्राणीमात्र भगवंतांना सम्मुख होऊ शकतो. भगवंताकडून कोणालाही मनाई नाही.

मनुष्यात जे संपूर्णपणे दुराचारात लागलेले आहेत. ते चांडाळ आणि पशु-पक्षी, कीट पतंगादी पापयोनीतील प्राण्यापेक्षाही अधिक दोषी आहेत. कारण पापयोनीतील लोकांचा तर पूर्वीच्या पापामुळे परवशतेने पाप योनीत जन्म होतो आणि तेथे त्यांना मागील पापांचा फलभोग मिळतो, परंतु दुराचारी माणसे येथे जाणून-बुजून वाईट आचरणांत प्रवृत्त होतात, अर्थात् नवीन पाप करतात. पापयोनीतील प्राणी तर मागील पापांचे फल भोगून उन्नतीकडे जातात आणि दुराचारी नवनवीन पाप करून पतनाकडे जातात. अशा दुराचाऱ्यासाठीही भगवंतांनी म्हटले आहे की, जर अत्यंत दुराचाऱ्यानेही मला अनन्य शरण होऊन माझे भजन केले, तर तोही सदा राहणाऱ्या शांतीला प्राप्त होईल. (९।३०-३१) त्याचप्रमाणे पाप्यातला पापीही ज्ञानरूपी नौकेने पापातून तरून आपला उद्धार करून घेतो (४।३६). तात्पर्य जर दुराचाराती दुराचारी आणि पाप्यातला पापी व्यक्तीही भक्ती आणि ज्ञान प्राप्त करून आपला उद्धार करू शकतो, तर मग इतर पापयोनी प्राण्यांना भगवंताकडून मनाई कशी होऊ शकेल? म्हणून येथे "भूत" (प्राणीमात्र) शब्द दिला आहे.

मानवेतर प्राण्यातही दैवी प्रकृती आढळून येत असल्याबद्दलच्या अनेक गोष्टी ऐकण्यात, वाचण्यात, पाहण्यात येतात. अशी कित्येक उदाहरणे आहेत, ज्यात पशु-पक्षाच्या योनीतही दैवी गुण असल्याचे दिसून येते.* कित्येक कुत्री अशी आहेत की, जे अमावस्या, एकादशी इत्यादीचे व्रत करतात आणि त्या दिवशी अन्न खात नाहीत. सत्संगातही मनुष्येतर प्राणी येऊन बसण्याच्या कथा ऐकल्या आहेत. सत्संगात साप देखील येऊन बसत असलेले पाहिले आहे. गोरखपूरमध्ये जेव्हा बारा महिन्याचा भजन-कीर्तनाचा (सत्संगाचा) कार्यक्रम झाला होता, तेव्हा एक काळा कुत्रा कीर्तन मंडळीं मधून येऊन सत्संगाच्या ठिकाणी बसायचा ऋषीकेशला (स्वर्गाश्रमात) एका वडाखाली एक साप येत असे. त्या ठिकाणी एक संत होते. एके दिवशी त्या संतांनी त्याला "थांब" म्हटले तर तो थांबला. संतांनी त्याला गीता ऐकविली, त्यावेळी तो शांत राहिला. गीता संपताच तो तिथून गेला. मग पुन्हा तेथे कधी आला नाही (अशा प्रकारच्या पशु-पक्ष्यामध्ये अशी प्रकृती पूर्व संस्कारानुसार स्वाभाविक असते)

अशा प्रकारे पशु-पक्ष्यातही दैवी-संपत्तीचे गुण पाहण्यात येतात. मात्र हे निश्चित आहे की, दैवी-संपत्तीच्या गुणांच्या विकासाचे क्षेत्र आणि योग्यता तेथे नाही. त्यांच्या विकासाचे क्षेत्र आणि योग्यता केवळ मनुष्यशरीरातच आहे.

पशू, पक्षी, जडी, बूटी, (वनस्पती) वृक्ष, लता इत्यादी जितके काही जंगम-स्थावर प्राणी आहेत त्या सर्वात दैवी आणि आसुरी-संपत्तीचे प्राणी असतात. मनुष्याने त्या सर्वांचे रक्षण केलेच पाहिजे कारण सर्वांच्या रक्षणासाठी, सर्वांची योग्य ती व्यवस्था ठेवण्यासाठीच हा मनुष्य बनविला गेला

* महाभारताच्या शांती पर्वात अशाच प्रसंगाची एक कथा आली आहे. शकुनिलुब्धक नावाचा एक शिकारी होता. त्याचे मुख्य काम पशु-पक्षी मारणे हेच होते. एके दिवशी तो शिकारीसाठी जंगलात गेला. दिवसभर फिरत राहिला परंतु खावयास काही मिळाले नाही. एकदम आकाश ढगानी भरले गेले आणि खूप जोरात वादळ व पाऊस सुरू झाला. तो शिकारी एका झाडाखाली येऊन बसला. त्याच झाडावर एक कबूतर व त्याची मादी राहत होती. ते दोघेही दाणे टिपण्यासाठी बाहेर गेले होते. पावसामुळे मादी लवकर परतली. पंख ओले झाल्याने गारठून ती खाली पडली. तेव्हा शिकाऱ्याने तिला पकडून पिंजऱ्यात कोंडून टाकले. जेव्हा कबूतर घरी आले तेव्हा मादी न दिसल्यामुळे विलाप करू लागले. त्याचा विलाप ऐकून त्याची मादी म्हणाली "हे प्राणनाथ! माझ्यासाठी इतका शोक का करता आहात? आपण आपल्या कर्तव्याचे पालन करा. आपल्या स्थानावर आलेल्या अतिथीचे आपण रक्षण करा. अतिथीचा सत्कार करणे गृहस्थीचे मुख्य कर्तव्य आहे. याची थंडी जाईल, भूक भागेल अशी व्यवस्था आपण केली पाहिजे. मी तर पिंजऱ्यात पडलेली आहे". आपल्या पत्नीचे हे वचन ऐकून कबूतराने आपल्या चोचीने वाळलेली पाने व लहानशा काटक्या जमा केल्या. मग एका घरातून जळती काडी आणून विस्तव केला. शिकारी थंडीने गारठला होता. विस्तवावर अंग शेकल्याने जेव्हा त्याला बरे वाटले तेव्हा त्याने कबूतराला म्हटले "मला भूक लागली आहे काय करू? " कबूतर म्हणाले "आपण चिंता करूनका. आपण माझे अतिथी आहात, मी आपली भूक मिटविण्याचा प्रयत्न करीन". कबूतराने बराच विचार केला. पण स्वत:च अग्नीत उडी घेण्याशिवाय अन्य उपाय त्याला सुचला नाही. म्हणून त्याने अग्नीला तीन प्रदक्षिणा करून त्यात उडी घेतली. त्याला अग्नीत जळताना पाहून शिकाऱ्याने विचार केला की, ह्या कबूतराने मला किती आराम दिला आहे. माझ्या भोजनासाठी तर त्याने स्वत:चे प्राणही दिले. अरेरे! मी किती क्रूर, निर्दयी, पापी आहे, हा पक्षी असून इतका आदर करतो आणि मी मनुष्य असूनही असे क्रूर काम करतो. आजपासून मी असे पाप कर्म कधी करणार नाही. असा निश्चय करून त्याने मादीला पिंजऱ्यातून सोडून दिले. आपल्या पतीच्या विरहाने ती मादी शोक करू लागली की, पतीशिवाय राहून मला काय करायचे आहे? असा शोक करीत तिनेही अग्नीत उडी घेतली. इतक्यात त्या दोघांनाही (कबूतर आणि त्याची मादी) घेऊन जाण्यास विमान आले आणि ती दोघेही विमानात बसून स्वर्ग लोकाला गेली.

त्यांना अशा प्रकारे विमानात बसून जातांना पाहून त्या शिकाऱ्याने आपली सर्व शस्त्रे फेकून दिली. त्याने असा निश्चय केला की, आता मी भजन-स्मरण करीन, त्याग-तपश्चर्या करून शरीराला सुकवीन काहीही खाणार-पिणार नाही. अशा विचाराने तो काटेरी जंगलात गेला काट्याने त्याचे शरीर सोलून निघाले. पुढे वनामध्ये चहुकडून आग (दावाग्नी) पेटली होती. त्या आगीत घुसून तो जळून मेला. अंतसमयी भजन-स्मरण करण्याने त्याची सद्गती झाली.

आहे. त्यातही जे सात्त्विक पशू, पक्षी, वनस्पती इत्यादी आहेत त्यांचे तर विशेष रक्षण केले पाहिजे, कारण त्यांच्या रक्षणाने आपल्यात संपत्ती वाढते. जसे गोमाता आपली पूजनीय आहे तर आपल्याला तिची रक्षा आणि पालन केले पाहिजे कारण गाय संपूर्ण सृष्टीचे कारण आहे "**गावो विश्वस्य मातरः**" गायीच्या तुपानेच यज्ञ होतो, म्हशीच्या तुपाने होत नाही. यज्ञाने पाऊस पडतो. पावसामुळे अन्न आणि अन्नाने प्राणी उत्पन्न होतात. त्या प्राण्यांपैकी शेतीसाठी बैलाची आवश्यकता असते. ते बैल गायीपासून उत्पन्न होतात. बैलाने शेती होते. अर्थात् बैलांनी नांगरट केली जाते तसेच विहीरीतून पाणी काढून शेतीला दिले जाते. शेतीपासून अन्न , वस्त्र इत्यादी निर्वाहाच्या वस्तू उत्पन्न होतात, त्याने मनुष्य, पशू इत्यादी सर्वांचा जीवननिर्वाह होतो. निर्वाहामध्येही गायीचे तूप-दूध आपल्या खाण्या पिण्याच्या कामी येते. त्या तूप-दुधाने आपल्या शरीरात बल आणि अंतःकरणात सात्त्विक भाव वाढतात. त्याचप्रमाणे जितक्या वनस्पती आहेत, त्यापैकी सात्त्विक वनस्पतींनी कायाकल्प होतो, रोग नाहीसे होतात आणि शरीर पुष्ट होते. म्हणून आपण सात्त्विक पशू, पक्षी, वनस्पती इत्यादीचे विशेष रक्षण केले पाहिजे, त्यामुळे आपले इहलोकी आणि परलोकी कल्याण होते.

**दैवो विस्तरशः प्रोक्तः**—भगवान् म्हणतात की, दैवी-संपत्तीचे मी विस्ताराने वर्णन केले आहे. याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात नऊ, दुसऱ्या श्लोकात अकरा आणि तीसऱ्या श्लोकात सहा—याप्रमाणे दैवी संपत्तीचे एकूण सव्वीस लक्षणांचे वर्णन केले गेले आहे. यापूर्वीही गुणातीताच्या लक्षणात (१४।२२-२५), ज्ञानाच्या वीस साधनांमध्ये (१३। ७-११), भक्तांच्या लक्षणांमध्ये (१२।१३-१९), कर्मयोग्याच्या लक्षणांमध्ये (६।७-९) आणि स्थितप्रज्ञाच्या लक्षणांमध्ये (२। ५५-७१) दैवी संपत्तीचे विस्ताराने वर्णन झाले आहे.

**आसुरं पार्थ मे शृणु**—भगवान् म्हणतात की, आता तू माझ्याकडून आसुरी-संपत्ती विस्ताराने ऐक अर्थात् जे मनुष्य केवळ प्राणपोषणपरायण असतात, त्यांचा स्वभाव कसा असतो—ते माझ्याकडून ऐक.

**परिशिष्ट भाव**—दैवी आणि आसुरी—या दोन प्रकारच्या प्राण्यांची सृष्टी मनुष्यलोकात असल्यामुळे लौकिक आहेत. अलौकिक तत्त्वात या दोन्हीही नाहीत. साधनसुद्धा लौकिक आणि अलौकिक दोन्ही असतात, परंतु साध्य अलौकिकच असते. अलौकिक तत्त्व व्यापक, अनंत-अपार आहे. लौकिकसुद्धा त्याच्याच अंतर्गत आहे. वास्तविक लौकिकाची स्वतंत्र सत्ताच नाही. सर्व काही अलौकिकच आहे. जीवानेच लौकिकाला धारण केले आहे—'**ययेदं धार्यते जगत्**' (गीता ७।५). तात्पर्य हे आहे की, जोपर्यंत जीवाच्या दृष्टीत संसाराची सत्ता आहे, तोपर्यंत 'लौकिक' आहे. संसाराची सत्ता न राहिल्यास सर्व 'अलौकिक'च आहे—'**वासुदेवःसर्वम्**', '**सदसच्चाहम्**'.

***संबंध**—भगवंताला विमुख झालेल्या मनुष्यात आसुरी संपत्ती कोणत्या क्रमाने येते* याचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

## प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः।
## न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते॥७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आसुराः** | = आसुरी प्रकृतीचे | | व्हावे (—हे) | **न** | = नसते, |
| **जनाः** | = मनुष्य | **विदुः** | = जाणत | **आचारः** | = श्रेष्ठ आचरणही |
| **प्रवृत्तिम्** | = कशात प्रवृत्त व्हावे | **न** | = नाहीत | **न** | = नसते |
| **च** | = आणि | **च** | = आणि | **च** | = तसेच |
| **निवृत्तिम्** | = कशातून निवृत्त | **तेषु** | = त्यांच्यात तर | **सत्यम् अपि** | = सत्य-पालनही |
| | | **शौचम्** | = बाह्य शुद्धीही | **विद्यते न** | = नसते. |

* सुरवातीलाच चांगले शिक्षण न मिळाल्यामुळे ते आसुर प्राणी पुढील गोष्टी जाणत नाहीत. काय करावे आणि काय करू नये, शरीराची शुद्धी काय असते आणि अशुद्धी काय असते, खाणे-पिणे कोणते शुद्ध असते आणि कोणते अशुद्ध असते, लहान मोठ्याशी कसे वागावे आणि कसे वागू नये, वाणी इत्यादीचे सत्य काय असते आणि असत्य काय असते, शिक्षणाच्या अभावामुळे ते प्रवृत्ती आणि निवृत्ती, शौच, सदाचार आणि सत्य या सर्वांना जाणत नाहीत. या कारणाने ते सत्य तत्त्व परमात्म्याला विमुख होतात. परमात्म्याला विमुख झाल्याने ते ईश्वर, धर्म इत्यादींना मानीत नाहीत आणि त्यांच्या मर्यादाही मानीत नाहीत. ते स्त्री-पुरुषाच्या संगानेच संसाराची उत्पत्ती मानतात. अशा प्रकारे नास्तिक दृष्टीचा आश्रय घेऊन ते दुसऱ्यांना दुःख देतात आणि आपले महान् पतन करून घेतात.

*व्याख्या*— **प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुरा:**— आजकालचे उच्छृंखल वातावरण, खाणे-पिणे, शिक्षण इत्यादीच्या प्रभावाने प्राय: मनुष्य प्रवृत्ती आणि निवृत्ती अर्थात् कशात प्रवृत्त व्हावे आणि कशापासून निवृत्त व्हावे हे जाणत नाहीत आणि जाणू इच्छितही नाहीत. एखादा यांना समजावयाला लागला तर त्याचे मानीत नाहीत उलट त्याची चेष्टा करतात, त्याला मूर्ख समजतात आणि अभिमानाने स्वत:ला फार बुद्धिमान् समजतात. काही लोक (प्रवृत्ती आणि निवृत्तीला) जाणतही असतात, परंतु त्यांच्यावर आसुरी सम्पदेचा विशेष प्रभाव असल्याकारणाने त्यांची विहित कार्यात प्रवृत्ती आणि निषिद्ध कार्यातून निवृत्ती होत नाही. या कारणाने प्रवृत्ती आणि निवृत्तीला न जाणल्यामुळे, सर्वात प्रथम आसुरी-संपत्ती येते.

प्रवृत्ती आणि निवृत्ती यांना कसे जाणावे? यांना गुरू-द्वारा, ग्रंथद्वारा, विवेकाद्वारा, जाणले जाऊ शकते. याशिवाय त्या मनुष्यावर एखादे संकट ओढवले, विशेष अडचणीत सापडला, एखादी विचित्र घटना घडली, तर विवेकशक्ती जागृत होते. एखाद्या महापुरुषाच्या दर्शनाने पूर्व संस्कारानुसार मनुष्याची वृत्ती बदलून जाते अथवा महान् साधू संतांची पुण्य-भूमी असलेल्या ठिकाणी, तीर्थाच्या ठिकाणी गेल्यासही विवेकशक्ती जागृत होते.

प्रत्येक प्राण्यात विवेकशक्ती असते. परंतु पशु-पक्षी इत्यादी योनीत तिला विकसित करण्याची संधी, स्थान व योग्यता नसते आणि मनुष्यात तिला विकसित करण्याची संधी, स्थान आणि योग्यताही असते. पशु-पक्ष्यात ती विवेक-शक्ती केवळ स्वत: च्या शरीरनिर्वाहापर्यंतच मर्यादित राहते, परंतु मनुष्य या विवेकशक्तीपासून आपले आणि आपल्या परिवाराचे तसेच इतर प्राण्यांचेही पालन-पोषण करू शकतो आणि दुर्गुण-दुराचारांचा त्याग करून सद्गुण-सदाचारांचा अंगीकारसुद्धा करू शकतो. यात मनुष्य पूर्णपणे स्वतंत्र आहे, कारण ती साधनयोनी आहे. परंतु पशु-पक्षी यात स्वतंत्र नाहीत कारण ती भोगयोनी आहे.

जेव्हा मनुष्याची खाणे-पिणे इत्यादीमध्येच विशेष वृत्ती राहते, तेव्हा त्याला कर्तव्य आणि अकर्तव्याची शुद्ध राहत नाही. त्या मनुष्यात पशूप्रमाणे दैवी-संपत्ती दबून राहते प्रगट होत नाही. अशा मनुष्यासाठी भगवंतांनी जना: पद दिले आहे अर्थात् तेही मनुष्य म्हणविण्यालायक आहेत कारण त्यांच्यात दैवी-संपत्ती प्रगट होऊ शकते.

## विशेष संकेत

"**जना:**" (१६।७) पासून "**नराधमान्**" (१६।१९) पदापर्यंत, मध्यंतरी आलेल्या श्लोकात कुठेही भगवंतांनी मनुष्यवाचक शब्द दिला नाही. याचे तात्पर्य, जरी मनुष्यामध्ये आसुरी-संपत्तीचा त्याग करण्याची तसेच दैवी-संपत्ती अंगीकार करण्याची योग्यता आहे, तरीपण जी माणसे होऊनही दैवी-संपत्तीचा अंगीकार न करता आसुरी-संपत्ती कायम ठेवतात, ती माणसे म्हणविण्याला योग्य नाहीत. अशी माणसे पशू आणि नरकातील प्राण्यांपेक्षाही निकृष्ट आहेत. कारण पशू आणि नारकीय प्राणी तर पापांचे फल भोगून पवित्रतेकडे जात आहेत आणि ही आसुरी स्वभावाची माणसे, ज्या पुण्याने मनुष्यशरीर मिळाले आहे, त्याला नष्ट करून आणि येथे नवीन-नवीन पापे करून पशू, पक्षी इत्यादी योनीकडे तसेच नरकाकडे जात आहेत. म्हणून त्यांच्या दुर्गतीचे वर्णन याच अध्यायाच्या सोळाव्या आणि एकोणीसाव्या श्लोकामध्ये केले गेले आहे.

भगवंतांनी आसुर मनुष्यांची जितकी लक्षणे सांगितली आहेत त्यात त्यांना पशू इत्यादींचे विशेषण न देता "**अशुभान्**", "**नराधमान्**" विशेषणे दिली आहेत. कारण पशू इत्यादी इतके पापी नाहीत आणि त्यांच्या दर्शनाने पापही लागत नाही परंतु आसुर माणसांकडून विशेष पापे होतात आणि त्यांच्या दर्शनाने पाप लागते, अपवित्रता येते. याच अध्यायाच्या बावीसाव्या श्लोकात "नर:" पद देऊन हे सांगतात की, जो काम-क्रोध-लोभरूपी नरकाच्या दारातून सुटून आपल्या कल्याणाचे आचरण करतो, तोच मनुष्य म्हणविण्यायोग्य आहे. पाचव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकातही "नर:" पदाने याच गोष्टीचे समर्थन केले आहे.

**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते**—प्रवृत्ती आणि निवृत्तीला न जाणल्यामुळे त्या आसुर स्वभावांच्या मनुष्यांचे शुद्धी-अशुद्धीकडे लक्षच नसते. त्यांना सांसारिक वर्तणूक, व्यवहार याचेही ज्ञान नसते अर्थात् माता-पिता इत्यादी वडीलधारी माणसाशी तसेच इतर मनुष्यांशी कसे वागावे व कसे वागू नये ह्या गोष्टी ते जाणतच नाहीत. त्यांच्यात सत्य नसते अर्थात् ते असत्य बोलतात आणि आचरणही असत्यच ठेवतात. तात्पर्य, असे पुरुष असुर असतात. खाणे-पिणे, आरामात राहणे तसेच "मी जिवंत रहावे, संसाराचे सुख भोगत रहावे आणि संग्रह करत रहावे" इत्यादी उद्देश असल्याने त्यांची शौचाचाराकडे आणि सदाचाराकडे दृष्टीच जात नाही.

भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या चौवेचाळीसाव्या श्लोकात सांगितले आहे की, वैदिक प्रक्रियानुसार सांसारिक

भोग आणि संग्रहात लागलेल्या पुरुषातही परमात्मप्राप्तीचा एक निश्चय नसतो. भाव असा की, आसुरी संपदेचा अंश असल्याकारणाने जर असे शास्त्र-विधीयुक्त यज्ञादी कर्मात लागलेले पुरुषही परमात्म्याचा एक निश्चय करू शकत नाहीत, तर ज्या माणसांमध्ये आसुरी संपदेचे अधिक्य असते अर्थात् जे अन्यायपूर्वक भोग आणि संग्रहात लागलेले आहेत, त्यांच्या बुद्धीमध्ये परमात्म्याचा एक निश्चय होणे किती कठीण आहे?*

**परिशिष्ट भाव**—जस-जशी आसुरी-संपत्ती येते, तस-तसा विवेक लुप्त होत जातो. भोगपरायण झाल्यामुळे आसुर मनुष्य 'काय करावे आणि काय करू नये'—हे जाणू शकत नाहीत. त्यांची निष्ठा तर लौकिकही नसते, अलौकिक तर दूरच राहाते! त्यांची निष्ठा नरकात घेऊन जाणारी असते.

आसुर मनुष्य पिंडप्राणपोषणपरायण असतात. म्हणून ते केवळ आपले सुख-आराम, आपला स्वार्थ पाहतात. ज्याच्याद्वारा आपल्याला सुख मिळेल असे दिसते, त्यातच त्यांची प्रवृत्ती होते आणि ज्याच्याद्वारा आपल्याला दु:ख मिळेल असे दिसते, स्वार्थ सिद्ध होत असलेला दिसत नाही, त्यापासूनच त्यांची निवृत्ती होते. वास्तविक प्रवृत्ती आणि निवृत्ती यात शास्त्र हेच प्रमाण आहे (गीता—सोळाव्या अध्यायाचा चोवीसावा श्लोक). परंतु आपल्या शरीर आणि प्राणांविषयी मोह राहिल्यामुळे आसुर मनुष्यांची प्रवृत्ती आणि निवृत्ती शास्त्रानुसार नसते. आसुर स्वभावामुळे ते शास्त्राची आज्ञा ऐकतच नाहीत आणि जर ऐकलीही तरी त्याला ते समजू शकतच नाहीत— **'यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः'** (गीता १५। ११).

*संबंध—जर सत्कर्मामध्ये प्रवृत्ती झाली नाही तर सद्भावांचाही निरादर होतो अर्थात् सद्भाव दबत जातात. ही गोष्ट आता सांगत आहेत.*

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम्।**
**अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम्॥ ८॥**

**ते** = ते
**आहुः** = म्हणतात की,
**जगत्** = संसार
**असत्यम्** = असत्य,
**अप्रतिष्ठम्** = मर्यादाविना (आणि)
**अनीश्वरम्** = ईश्वराविना
**अपरस्पर-सम्भूतम्** = आपोआप केवळ स्त्री-पुरुषाच्या संयोगाने उत्पन्न झाला आहे.
**कामहैतुकम्** = (म्हणून) काम हाच याला कारण आहे,
**अन्यत्** = त्याशिवाय दुसरे
**किम्** = कोणते कारण आहे? (दुसरे कारण होऊच शकत नाही.)

*व्याख्या*—**असत्यम्**—आसुर स्वभावाचे पुरुष म्हणत असतात की, हे जगत् असत्य आहे अर्थात् यातील कोणतीच गोष्ट सत्य नाही. जितकी काही यज्ञ, दान, तप, ध्यान, स्वाध्याय, तीर्थ, व्रत, इत्यादी शुभ कर्म केली जातात, त्यांना ते सत्य मानत नाहीत. ह्या गोष्टी ते फसवणूक समजतात.

**अप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम्**—संसारात आस्तिक पुरुषांची धर्म, ईश्वर, परलोक† (पुनर्जन्म) इत्यादीविषयी श्रद्धा असते. परंतु ते आसुर मनुष्य धर्म, ईश्वर इत्यादीत श्रद्धा ठेवत नाहीत, म्हणून ते असे मानतात की, या संसारात धर्म-अधर्म, पुण्य-पाप इत्यादींची कोणतीही प्रतिष्ठा-मर्यादा नाही. या जगताला मालकरहित म्हणतात अर्थात् या जगताला रचणारा, याचे शासन करणारा, येथे केलेल्या पाप पुण्याचे फल भोगविणारा कोणीही (ईश्वर) नाही.‡

**अपरस्परसम्भूतं किमन्यत् कामहैतुकम्**—ते म्हणतात की, स्त्रीला पुरुषाची आणि पुरुषाला स्त्रीची कामना झाली. म्हणून त्या दोघांच्या परस्पर संयोगाने हा संसार उत्पन्न झाला. म्हणून कामच या संसाराचा हेतू आहे. त्यासाठी ईश्वर, प्रारब्ध इत्यादीची काय गरज आहे? ईश्वर इत्यादींना याचे कारण मानने हा केवळ दंभ आहे, जगाला केवळ फसविणे आहे.

* पापवंत कर सहज सुभाऊ। भजनु मोर तेहि भाव न काऊ॥ (मानस ५। ४४। २)

† मृत्यूनंतर जो जन्म होतो, तो मग मृत्युलोकी होवो किंवा अन्य लोकी होवो, मग मनुष्य, पशु-पक्षी इत्यादी कोणत्याही योनीत होवो तो सर्व ''परलोक'' च आहे.

‡ ''अनीश्वर'' पदाचे तात्पर्य, आसुरी संपत्तीचे लोक ईश्वराला मानीत नाहीत. ''प्राप्तौ सत्यां निषेधः'' या न्यायानुसार हे सिद्ध होते की, ईश्वराची सत्ता तर आहे, परंतु ते ती स्वीकार करीत नाहीत. ईश्वराची सत्ता न मानल्याने ते अपार चिंतांनी घेरले जातात (१६। ११). परंतु ईश्वराची सत्ता मानून त्याच्या आश्रित राहणारे दैवी-संपत्तीची माणसे निश्चिन्त आणि निर्भय राहतात.

*संबंध— ज्यावेळी सद्भाव लुप्त होतो, त्यावेळी सद्विचार काम करीत नाहीत अर्थात् सद्विचार प्रकट होतच नाहीत—ही गोष्ट पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥**

**एताम्** = या (पूर्वोक्त)
**दृष्टिम्** = (नास्तिक) दृष्टीचा
**अवष्टभ्य** = आश्रय घेणारे
**नष्टात्मानः** = जे मनुष्य आपल्या नित्य स्वरूपाला मानीत नाहीत
**अल्पबुद्धयः** = ज्यांची बुद्धी तुच्छ आहे,
**उग्र कर्माणः** = जे उग्र कर्म करणारे (आणि)
**जगतः** = संसाराचे
**अहिताः** = शत्रू आहेत,
**क्षयाय, प्रभवन्ति** = त्या मनुष्यांच्या शक्तीचा उपयोग जगताचा नाश करण्यासाठीच होतो.

*व्याख्या*— **एतां दृष्टिमवष्टभ्य**—कोणतेही कर्तव्या-कर्तव्य नाही, शौचाचार-सदाचार नाही, ईश्वर नाही, प्रारब्ध नाही, पाप-पुण्य नाही, परलोक नाही, केलेल्या कर्मांचे दण्ड-विधान नाही—अशा नास्तिक दृष्टीचा आश्रय घेऊन ते वागतात.

**नष्टात्मानः**—आत्मा चेतन तत्त्व आहे, त्याची कोणती सत्ता आहे—ही गोष्ट ते मानीतच नाहीत. ते तर असे मानतात की, जसे कात आणि चुना याच्या मिश्रणाने लाली निर्माण होते, त्याचप्रमाणे भौतिक तत्त्वांच्या मीलनातून चेतनता निर्माण होते. ते चेतन काही वेगळी वस्तू आहे—असे काही नाही. त्यांच्या दृष्टीत जडच मुख्य असते. म्हणून ते चेतन तत्त्वापासून पूर्णपणे विमुख राहतात. चेतन तत्त्वापासून (आत्मा) विमुख झाल्याने त्यांचे पतन झालेलेच असते.

**अल्पबुद्धयः**—त्यांच्या ठिकाणी जो विवेक-विचार असतो, तो अत्यंतच अल्प, तुच्छ असतो. त्यांची दृष्टी केवळ दृश्य पदार्थांवर अवलंबून राहते की, कमवावे, खावे, प्यावे आणि मौज करावी. पुढे भविष्यात याचा परिणाम काय होइल? परलोकात काय होईल? ह्या गोष्टी त्यांच्या बुद्धीत येत नाहीत.

येथे अल्पबुद्धीचा असा अर्थ नाही की, प्रत्येक कामात त्यांची बुद्धी काम करीत नाही. सत्य-तत्त्व काय आहे? धर्म काय आहे? अधर्म काय आहे? सदाचार-दुराचार काय आहेत? आणि त्यांचा परिणाम काय होईल? या विषयात त्यांची बुद्धी काम करीत नाही. परंतु धनसंग्रहाविषयी त्यांची बुद्धी अत्यंत तल्लख असते. तात्पर्य पारमार्थिक उन्नतीच्या विषयात त्यांची बुद्धी तुच्छ असते आणि सांसारिक भोगात फसण्यासाठी त्यांची बुद्धी फार कुशल असते.

**उग्रकर्माणः**—ते कोणालाच भीत नाहीत. फक्त चोर, डाकू किंवा राजकीय माणसालाच ते भितात. ईश्वर, परलोक, मर्यादा यांना भीक घालीत नाहीत. ईश्वर आणि परलोकाचे भय नसल्याने त्यांच्याकडून दुसऱ्यांची हत्या इत्यादी फार भयंकर कर्म होतात.

**अहिताः**—त्यांचा स्वभाव दुष्ट असल्यामुळे ते दुसऱ्याचे अहित (नुकसान) करण्यातच लागलेले असतात आणि दुसऱ्यांचे नुकसान करण्यामध्येच त्यांना सुख होत असते.

**जगतः क्षयाय प्रभवन्ति**—त्यांच्याजवळ जी शक्ती, ऐश्वर्य, सामर्थ्य, पद, अधिकार असतो, तो सर्वच्या सर्व दुसऱ्यांचा नाश करण्यातच वापरला जातो. दुसऱ्यांचा नाश हेच त्यांचे उद्दिष्ट असते. स्वतःचा स्वार्थ पूर्ण सिद्ध होवो, कमी सिद्ध होवो अथवा मुळीच न होवो, परंतु ते दुसऱ्यांची उन्नती सहन करू शकत नाहीत. दुसऱ्यांचा नाश करण्यातच त्यांना सुख होते अर्थात् दुसऱ्यांच्या हक्कावर गदा घालणे, एखाद्याला ठार करणे, यातच ते प्रसन्न राहतात. सिंह जसा दुसऱ्या पशूंना खाऊन टाकतो, दुसऱ्यांच्या दुःखाची पर्वा करीत नाही आणि राजकीय स्वार्थी ऑफिसर जसे दहा, पन्नास, शंभर रुपयासाठी हजारो रुपयांचे सरकारी नुकसान करतात. त्याचप्रमाणे आपला स्वार्थ सिद्ध करण्यासाठी दुसऱ्यांचे मग कितीही नुकसान होवो त्याची ते परवा करीत नाहीत. ती आसुर स्वभावाची माणसे पशू-पक्ष्यांनाही खातात आणि आपल्या थोड्याशा सुखासाठी दुसऱ्यांना किती दुःख झाले, याचा विचारच करू शकत नाहीत.

*संबंध— ज्यावेळी सत्कर्म, सद्भाव आणि सद्विचाराचा निरादर होतो, त्यावेळी मनुष्य कामनेचा आश्रय घेऊन काय करतो हे पुढील श्लोकात सांगतात.*

**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः।**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **दुष्पूरम्** | = कधी पूर्ण न होणाऱ्या | **मदान्विताः** | आणि मद यात मग्न राहणारे (तसेच) | **मोहात्** | = मोहामुळे |
| **कामम्** | = कामनांचा | | | **असद्ग्राहान्** | = दुराग्रह |
| **आश्रित्य** | = आश्रय घेऊन | **अशुचिव्रताः** | = अपवित्र व्रत धारण करणारे मनुष्य | **गृहीत्वा** | = धारण करून |
| **दम्भमान-** | = दंभ, अभिमान | | | **प्रवर्तन्ते** | = (संसारात) वावरत असतात. |

***व्याख्या*— कामममाश्रित्य दुष्पूरम्—**ते आसुरी प्रकृतीचे लोक कधीही पूर्ण न होणाऱ्या कामनांचा आश्रय घेतात. जसे एखादा मनुष्य भगवंताचा, कोणी कर्तव्याचा, कोणी धर्माचा, कोणी स्वर्ग इत्यादींचा आश्रय घेतो, त्याचप्रमाणे आसुर प्राणी कधी पूर्ण न होणाऱ्या कामनांचा आश्रय घेतात. त्यांच्या मनाची अशी निश्चित धारणा असते की, कामनेशिवाय माणूस दगडाप्रमाणे होतो. कामनेच्या आश्रयाशिवाय मनुष्याची उन्नती होऊ शकत नाही. आज जितकी माणसे नेते, पंडित, श्रीमंत झाली आहेत ती सर्व कामनेमुळेच झाली आहेत. अशा प्रकारे कामनेच्या आश्रित राहणारे भगवंत, परलोक, प्रारब्ध इत्यादींना मानीत नाहीत.

आता त्या कामनेची पूर्ती कशाद्वारा करावयाची? त्याचे साथी (साहाय्यक) कोण आहेत? तर सांगतात "**दम्भमान-मदान्विताः**" ते दंभ, मान आणि मदाने युक्त असतात अर्थात् हे त्यांच्या कामनापूर्तीचे बळ आहे. जेथे ज्यांच्यासमोर जसे बनल्याने आपला मतलब सिद्ध होत असेल अर्थात् धन, मान, सन्मान, पूजा-प्रतिष्ठा, आदर-सत्कार, प्रशंसा इत्यादी प्राप्त होत असेल, तेथे त्यांच्यासमोर तसेच आपल्याला दाखविणे "दंभ" आहे. स्वतःला श्रेष्ठ समजणे, श्रीमंत मानणे! "मान" आहे. आमच्याजवळ इतकी विद्या, बुद्धी, योग्यता, इत्यादी आहे. याच्या अनुषंगाने धुंदी चढणे "मद" आहे. ते सदा दंभ, मान आणि मद यातच चूर राहतात, तदाकार राहतात.

**अशुचिव्रताः**—त्यांचे व्रत, नियम फार अपवित्र असतात. जसे "इतक्या गावात इतक्या गायींच्या गोठ्यांना आग लावायची आहे, इतक्या माणसांना ठार करायचे आहे." इत्यादी. हे वर्ण, आश्रम,आचार-शुद्धी इत्यादी सर्व पोकळ युक्तिवाद आहे. म्हणून आम्ही कोणाहीबरोबर खाणार-पिणार. आम्ही कथा इत्यादी ऐकणार नाही, आम्ही तीर्थ, मंदिर या ठिकाणी जाणार नाही. असे त्यांचे अनेक व्रत-नियम असतात.

असे नियम करणारे डाकूही असतात. त्यांचा असा नियम असतो की, मारपीट केल्याशिवाय एखाद्याने धन दिले तर ते घेणार नाहीत. जोपर्यंत ते मारपीट करणार नाहीत, वार करून त्याचे रक्त टपकणार नाही तोपर्यंत त्याची वस्तू घेणार नाहीत इत्यादी.

**मोहाद् गृहीत्वासद्ग्राहान्—**मूढतेमुळे ते अनेक प्रकारे दुराग्रही बनतात. तामस बुद्धीने वागणे हीच मूढता आहे (१८। ३२). ते शास्त्र, वेद, आश्रम, कुलपरंपरा यांच्या मर्यादा मानीत नाहीत, उलट त्यांच्या विरुद्ध वागण्यात, यांना भ्रष्ट करण्यातच ते आपला पुरुषार्थ, गौरव समजतात. ते अकर्तव्यालाच कर्तव्य आणि कर्तव्याला अकर्तव्य समजतात, हिताला अहित आणि अहिताला हित मानतात, योग्याला अयोग्य आणि अयोग्याला योग्य मानतात. या असद्विचारामुळे त्यांची बुद्धी इतक्या खालच्या थराला जाते की, ते हे म्हणू लागतात की आई-वडिलांचे आमच्यावर काहीही ऋण नाही. त्यांच्याशी आमचा काय संबंध आहे? असत्य, कपट, बेईमानी करून का होईना पण धन कसे सुरक्षित राहील? असे त्यांचे दुराग्रह असतात.

**परिशिष्ट भाव—"कामममाश्रित्य दुष्पूरम्"**—तीसऱ्या अध्यायातसुद्धा भगवंताने म्हटले आहे की, हा काम फार खादाड आहे—'**महाशनः**' (३। ३७) आणि अग्नीसारखा कधी तृप्त न होणारा आहे—'**दुष्पूरेणानलेन च**' (३। ३०). म्हणून सर्व कामनांची पूर्ती कधी संभवत नाही. म्हणून कामनापूर्ती हाच ज्यांचा उद्देश आहे, त्यांना कधी शांती मिळत नाही. कामनापूर्तीत महान् परतंत्रता आहे. परंतु आसुर मनुष्य या परतंत्रतेतही स्वतंत्रतेचा अनुभव करतात की, धनादी पदार्थ मिळाले तर आपण स्वतंत्र होऊ. ते शास्त्र, गुरू, ईश्वर, धर्म इत्यादीला मानीतच नाहीत, तरमग कामाशिवाय इतर कोणाचा आश्रय घेतील?

***संबंध*—*सत्कर्म, सद्भाव आणि सद्विचार यांच्या अभावी आसुरी प्रकृती असणारांचे नियम भाव आणि आचरण कोणत्या उद्देशाने आणि कशा प्रकारचे असतात हे पुढील दोन श्लोकांत सांगतात.***

**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः॥ ११॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रलयान्ताम् | = (ते) मृत्यूपर्यंत राहणाऱ्या | कामोपभोग-परमाः | = पदार्थांचा संग्रह आणि त्यांचा भोग घेण्यातच मग्न राहणारे | एतावत् | = 'जे काही आहे, ते एवढेच आहे'— |
| अपरिमेयाम् | = अपार | | | इति | = असा |
| चिन्ताम् | = चिंतेचा | | | निश्चिताः | = निश्चय करणारे असतात. |
| उपाश्रिताः | = आश्रय घेणारे, | च | = आणि | | |

*व्याख्या*—**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः**—आसुरी संपदा असणाऱ्या मनुष्यात इतक्या चिंता असतात की, त्यांची गणतीच करवत नाही. जोपर्यंत प्रलय अर्थात् मृत्यू येत नाही तोपर्यंत त्यांच्या चिंता समाप्त होत नाहीत. अशा प्रलयापर्यंत राहणाऱ्या चिंतेचे फळसुद्धा प्रलयच प्रलय अर्थात् वारंवार मरणच असते.

चिंतेचे दोन विषय असतात. एक पारमार्थिक आणि दुसरा सांसारिक. माझे कल्याण, माझा उद्धार कसा होईल? परब्रह्म परमात्म्याचा निश्चय कसा होईल? (**''चिन्ता परब्रह्म-विनिश्चयाय''**). अशा प्रकारे ज्यांना पारमार्थिक चिंता होते, ते श्रेष्ठ आहेत. परंतु आसुरी-संपत्ती असणाऱ्यांना अशी चिंता नसते. ते तर याच्या उलट सांसारिक चिंतेच्या आश्रित राहतात की, आम्ही कसे जिवंत राहू? आपला जीवननिर्वाह कसा होईल? आमच्याशिवाय म्हातारी माणसे कोणाच्या आश्रयावर जगतील? आमचा मान, आदर, प्रतिष्ठा, इभ्रत, प्रसिद्धी, नाव इत्यादी कसे कायम राहील? मृत्यूनंतर आमच्या मुला-बाळांची कशी स्थिती होईल? मृत्यूनंतर धन-संपत्ती, जमीन-इस्टेटीचे काय होईल? पैशाशिवाय आमचे काम कसे चालणार? पैशाशिवाय घराची डागडुची कशी होईल? इत्यादी इत्यादी.

मनुष्य विनाकारण चिंता करतो. निर्वाह तर होतच राहतो. निर्वाहाच्या वस्तू तर शिल्लक राहतील आणि त्या असतानाच मृत्यू येईल. विरक्तापेक्षाही विरक्त माणसाची देखील फाटकी लंगोटी आणि तुटके कमंडलू शिल्लक राहते आणि तो अगोदर मरतो. त्याचप्रमाणे सर्व व्यक्ती, वस्तू इत्यादी राहत असतानाच मरत असतात. असा नियम नाही की, धन जवळ असल्याने मनुष्य मरत नाही. धन जवळ असतानाच मनुष्य मरतो आणि पैसा पडून राहतो, कामी येत नाही.

एक फार मोठा श्रीमंत मनुष्य होता. त्याने तिजोरी-सारखे एक लोखंडी घर तयार केले होते आणि त्यात पुष्कळशी रत्न ठेवली होती. त्या घराचा दरवाजा असा बनविला होता की, जो बंद झाल्यावर चाबी शिवाय उघडत नव्हता. एकदा त्या माणसाने बाहेर चाबी विसरून त्या घरात प्रवेश केला आणि त्याने चुकीने दरवाजा बंद केला. आता चाबी वाचून दरवाजा उघडत नसल्याने त्याला अन्न, पाणी, हवा मिळेनासे झाले. त्यांच्या अभावात त्याने मरत असताना लिहून ठेवले की, ''येवढी धन-संपत्ती माझ्याजवळ असूनही मी मरत आहे, कारण मला आतमध्ये अन्न-पाणी आणि हवाही मिळत नाही.'' त्याचप्रमाणे खाद्य पदार्थ राहण्याने मरणार नाही असाही नियम नाही. भोग जवळ असूनही असाच मरेल. जसे पोटात रोग झालातर त्याला वैद्य-डॉक्टर (अन्न जवळ असूनही) अन्न खाऊ देत नाहीत, त्याचप्रमाणे मरण आले तर पदार्थ राहत असूनही मनुष्य मरत असतो.

जे आपल्याजवळ एका कौडीचाही संग्रह करीत नाहीत अशा विरक्त संतांनाही प्रारब्धानुसार आवश्यकतेपेक्षा अधिक वस्तू मिळतात. म्हणून जीवननिर्वाह, वस्तूंच्या अधीन नसतो.* परंतु हे तत्त्व आसुरी प्रकृतीची माणसे समजू शकत नाहीत. ते तर हे समजतात की, आम्ही चिंता करतो, कामना करतो, विचार करतो, प्रयत्न करतो तेव्हाच ह्या वस्तू मिळतात. जर असे केले नाही तर उपाशी मरावे लागेल.

**कामोपभोगपरमाः**—जे लोक धनादी पदार्थांचा उपभोग घेण्यात परायण आहेत, त्यांची तर नेहमी हीच इच्छा असते की, सुखसामग्रीचा संपूर्ण संग्रह करावा आणि भोग भोगावेत. त्यांना तर भोगासाठी, संसारात श्रीमंत होण्यासाठी, सुख-आराम, स्वाद-शौक इत्यादीसाठी धनाची आवश्यकता असते. तात्पर्य, त्यांच्यादृष्टीत भोगापेक्षा श्रेष्ठ काहीही नाही.

**एतावदिति निश्चिताः**—त्यांचा असा निश्चय असतो की, सुख भोगणे आणि संग्रह करणे याशिवाय दुसरे काही नाही.† या संसारात जे काही आहे ते, हेच आहे. म्हणून त्यांच्या दृष्टीत परलोक एक पोकळ युक्तिवाद आहे. त्यांची

* (१) प्रारब्ध पहले रचा, पीछे रचा शरीर। तुलसी चिन्ता क्यों करे, भज ले श्रीरघुवीर॥
(२) मुरदेको हरि देत है, कपडो लकडी आग। जीवित नर चिन्ता करे, उनका बडा अभाग॥
(३) धान नहीं धीणों नहीं, नहीं रुपैयो रोक। जीमण बैठे रामदास, आन मिलै सब थोक॥

† त्याचप्रमाणे स्वर्गाला मानणारी सकाम माणसेसुद्धा म्हणतात की, स्वर्गापेक्षा श्रेष्ठ काहीच नाही ''नान्य दस्तीति वादिनः'' (२।४२) त्यांची हीच कामना राहते की, मृत्यूनंतर आम्ही स्वर्गात जाऊ आणि तेथील दिव्य भोग भोगू. स्वर्गभोगाच्या तुलनेने येथील भोग निकृष्ट आहेत, असे ते मानतात.

अशी मान्यता असते की, मृत्यूनंतर कोठे जावे-यावे लागत नाही. बस, शरीर असेपर्यंत जितके भोग भोगून घेता येतील तेवढे भोगून घ्यावेत. कारण मृत्यूनंतर हे शरीर नष्ट होणार आहे.* शरीर स्थिर राहणारे नाहीच इत्यादी इत्यादी. भोगांच्या निश्चयापुढे ते पाप, पुण्य, पुनर्जन्म इत्यादीलाही मानीत नाहीत.

**परिशिष्ट भाव**—भोग आणि संग्रहात मग्न झालेला मनुष्य आंधळा होतो. तो संसारालाही जाणू शकत नाही आणि परमात्म्यालाही जाणू शकत नाही. अस्वाभाविक बुद्धी झाल्यामुळे त्याची दृष्टी परमात्म्याकडे जाऊच शकत नाही. तो अस्वाभाविक संसारालाच सत्य मानतो.

वस्तू विनाशी आहेत, आपण अविनाशी आहोत, तर मग पूर्ती कशी होईल? नाशवानाद्वारा अविनाशीची पूर्ती कशी होऊ शकते?

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान्॥ १२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आशापाशशतैः | = (ती) आशेच्या शेकडो पाशांनी | परायणाः | परायण होऊन | अर्थसञ्चयान् | = धन-संचय करण्याचा |
| बद्धाः | = बांधलेली माणसे | कामभोगार्थम् | = पदार्थांचा भोग घेण्यासाठी | ईहन्ते | = प्रयत्न करीत राहतात. |
| कामक्रोध- | = कामक्रोध | अन्यायेन | = अन्यायपूर्वक | | |

*व्याख्या*—**आशापाशशतैर्बद्धाः**—आसुरी-संपत्तीची माणसे आशारूपी शेकडो पाशांनी बांधलेली राहतात. अर्थात् त्यांना ''इतके धन प्राप्त होईल, इतका मान मिळेल, शरीरात निरोगता येईल'' इत्यादी शेकडो आशांचे पाश लागलेले असतात. आशेच्या पाशांनी बांधल्या गेलेल्या मनुष्याजवळ कोट्यवधी संपत्ती असली तरीही त्याची मागणी संपत नाही. त्यांची तर हीच आशा राहते की, संतापासूनही काही मिळावे, भगवंतापासूनही काही मिळावे, मनुष्यापासूनही काही मिळावे. एवढेच नव्हे तर, पशु-पक्षी, वृक्ष-वेली, पर्वत-समुद्र इत्यादीपासूनही काही मिळावे. अशा प्रकारे त्यांच्यात नेहमी खाव खाव सुटलेली राहते. अशा व्यक्तींच्या सांसारिक आशा कधी पूर्ण होत नाहीत (९। १२). समजा पूर्ण झाल्या तरी काहीही लाभ होत नाही. कारण ते जिवंत राहिले तर आशा केलेली वस्तू नष्ट होते आणि आशा केलेली वस्तू राहिली तर हे मरतात अथवा दोन्हीही नष्ट होतात.

जे आशारूपी फासाने बांधले गेलेले आहेत, ते कधी एके ठिकाणी स्थिर राहू शकत नाहीत आणि जे या आशारूपी पाशातून मुक्त झालेले आहेत, ते आनंदाने एका जागी राहतात.

**''आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृङ्खला।**
**यया बद्धाः प्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति पङ्गुवत्॥''**

**कामक्रोधपरायणाः**—त्यांचे परम अयन, स्थान काम आणि क्रोधच असतात.† अर्थात् स्वतःच्या कामनापूर्तीसाठी आणि क्रोधपूर्वक दुसऱ्यांना कष्ट देण्यासाठीच त्यांचे जीवन असते. काम-क्रोधाला परायण असलेल्या माणसांचा असा निश्चय असतो की, कामनेशिवाय माणूस जड होतो. क्रोधाशिवाय त्याचे तेजही राहत नाही. कामनेनेच सर्व कामे होतात नाहीतर माणूस काम कशाला करील? कामनेशिवाय मनुष्याचे जीवनच भारभूत होईल. संसारात काम आणि क्रोध ह्याच तर सार वस्तू आहेत त्याशिवाय लोक आपल्याला संसारात राहूच देणार नाहीत. क्रोधानेच शासन चालते नाहीतर शासनाला मानेलच कोण? क्रोधाने दाबून दुसऱ्यांना ठीक केले पाहिजे, नाही तर लोक आपले सर्वस्व लुटून घेतील. मग तर आपले काही अस्तित्वच राहणार नाही, इत्यादी.

**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान्**—आसुरी प्रकृती असणाऱ्या माणसांचा उद्देश धनाचा संग्रह करणे आणि विषयांचा भोग घेणे हा असतो. या उद्देशाच्या पूर्तीसाठी ते बेईमानी, धोकेबाजी, विश्वासघात, करांची चोरी इत्यादी करून दुसऱ्यांचा हक्क हिसकावून, मंदिर, बालक, विधवा इत्यादींच्या धनाचा अपहार करून व अशाच अन्य पाप कर्मांनी धनांचा संचय करू इच्छितात. कारण त्यांच्या मनात ही गोष्ट पक्की बसलेली असते की, आजकालच्या काळात इमानदारीने, न्याय-मार्गाने कोणी श्रीमंत थोडाच होऊ शकतो? हे जेवढे श्रीमंत झाले आहेत, सर्व अन्याय, चोरी, धोकेबाजी करूनच झालेले आहेत. ईमानदारीने, न्याय्य मार्गाने काम करणे ही गोष्ट केवळ

* यावज्जीवेत् सुखं जीवेद् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः॥

† याच अध्यायाच्या दहाव्या श्लोकात आलेले ''दम्भ, मान आणि मद'' तर त्यांचे साथी असतात आणि येथे आलेले ''काम आणि क्रोध'' त्यांचे आश्रय स्थान असतात.

बोलण्याची आहे, व्यवहारात कामी येऊ शकत नाही. जर आपण न्याय्य मार्गाने काम केले तर आपल्याला दुःख भोगावे लागेल आणि जीवन जगणेही कठीण होईल. असा त्या आसुरी स्वभाव असणाऱ्या व्यक्तींचा निश्चय असतो.

ज्या व्यक्ती न्याय्यमार्गाने स्वर्गभोग प्राप्तीसाठी लागलेल्या आहेत, त्यांच्यासाठीही भगवंतांनी म्हटले आहे की, त्या लोकांच्या बुद्धीत "आपणाला परमात्मप्राप्ती करायची आहे" हा निश्चय होऊ शकत नाही (२। ४४) तर मग अन्यायपूर्वक धन कमावून प्राणपोषणपरायण असलेल्यांच्या बुद्धीत परमात्मप्राप्तीचा निश्चय कसा होऊ शकतो? परंतु त्यांनीही जर इच्छा केली तर परमात्मप्राप्तीचा निश्चय करून ते साधनपरायण होऊ शकतात. असा निश्चय करण्यासाठी कोणालाही मनाई नाही, कारण मनुष्यजन्म परमात्मप्राप्तीसाठीच मिळाला आहे.

**परिशिष्ट भाव—'आशापाशशतैर्बद्धाः'**—येथे '**शतैः**' पद अनंताचा वाचक आहे. जोपर्यंत संसाराशी संबंध आहे तोपर्यंत कामनांचा अंत होत नाही. दुसऱ्या अध्यायाच्या एकेचाळीसाव्या श्लोकात आले आहे—'**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्**' 'अव्यवसायी मनुष्यांची बुद्धी अनंत आणि अनेक शाखा असलेली असते.' कारण त्यांनी अविनाशीपासून विमुख होऊन नाशवानाला सत्ता आणि महत्त्व दिले आणि त्याच्याशी संबंध जोडला.

'**कामक्रोधपरायणाः**' आसुर स्वभावाचे लोक काम आणि क्रोध यांना स्वाभाविक मानतात. काम आणि क्रोधाशिवाय त्यांना दुसरे काही दिसतच नाही, त्यांच्यापुढे यांची दृष्टी जातच नाही. हेच त्यांचे परम अयन अर्थात् स्थान आहेत.

मनुष्य असे समजतो की, क्रोध करण्याने दुसरा आपल्या वश राहील. परंतु जो मजबूरीने, लाचार होऊन आपल्या वश झाला आहे, तो कुठपर्यंत वशमध्ये राहील. संधी मिळताच तो घात करेल. म्हणून क्रोधाचा परिणाम वाईटच होतो.

*संबंध—आसुर स्वभावाचे लोक लोभ, क्रोध आणि अभिमानयुक्त होऊन कशी मनोरथ करीत असतात, हे पुढील तीन श्लोकांत क्रमाने सांगतात.*

## इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्।
## इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्॥ १३॥

ते अशाप्रकारे मनोरथ करीत असतात की—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इदम्** | = इतक्या वस्तू तर | **इमम्** | = या | **मे** | = आमच्याजवळ |
| **मया** | = आम्ही | **मनोरथम्** | = मथोरथांना | **अस्ति** | = आहेच, |
| **अद्य** | = आजपर्यंत | **प्राप्स्ये** | = प्राप्त (पूर्ण) करून घेऊ | **इदम्** | = इतके (धन) |
| **लब्धम्** | = मिळविल्या आहेत (आणि आता) | **इदम्** | = इतके | **पुनः, अपि** | = यापुढेही |
| | | **धनम्** | = धन तर | **भविष्यति** | = प्राप्त होईल. |

*व्याख्या—* **इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्**—आसुरी प्रकृतीचे लोक लोभपरायण होऊन मनोरथ करीत राहतात की, आपण आपल्या उद्योगाने, अक्कल हुशारीने, चालाखीने, विशिष्ट बुद्धीने, चातुर्याने इतक्या वस्तू तर आजपर्यंत मिळविल्या आहेत. इतक्या वस्तू तर आपल्याजवळ आहेत, इतक्या आणखी तेथून येतील. एवढे धन व्यापारातून येईल, आपला वडील मुलगा इतका शिकलेला आहे, म्हणून इतके धन आणि वस्तू तर त्याच्या लग्नात येतीलच. एवढे धन टॅक्स चुकवून मिळेल, एवढे जमीनीच्या पिकातून मिळेल, इतके घरभाड्यातून मिळेल, इतके व्याजातून प्राप्त होईल, इत्यादी इत्यादी.

**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्**—जस-जसा त्यांचा लोभ वाढत जातो, तस-तसे त्यांची मनोरथेही वाढत जातात. जेव्हा त्यांच्या चिंतनात वाढ होते, तेव्हा ते चालता-फिरता, काम धंदा करीत असताना, भोजन करताना, मल-मूत्राचा त्याग करताना आणि जर नित्यकर्म (पाठ-पूजा जप इत्यादी) करत असले, तर ते करत असतानासुद्धा "धन कसे वाढेल?" हे चिंतन करीत राहतात. इतकी दुकाने, मिल, कारखाने तर सुरू केले आहेत आणखी इतके सुरू करायचे आहेत. इतक्या गायी-म्हैशी, मेंढ्या-बकऱ्या, इत्यादी तर आहेतच, इतक्या आणखी व्हाव्यात. इतकी जमीन तर आपल्याजवळ आहे परंतु ही फार थोडी आहे, कोणत्याही प्रकाराने आणखी मिळेल तर फार बरे होईल. अशा प्रकारे धन इत्यादी वाढविण्याच्या विषयात त्यांची मनोरथे असतात.

जेव्हा त्यांची दृष्टी स्वतःच्या शरीराकडे तसेच परिवाराकडे जाते, तेव्हा ते त्याविषयी मनोरथ करू लागतात की,

अमुक औषधी सेवन केली तर शरीर योग्य राहील, अमुक वस्तू मिळविल्या तर आपण सुख आणि आरामात राहू. वातानुकूलित वाहन मिळावे म्हणजे बाह्य उष्णता भासणार नाही. लोकरीचे वस्त्र मागवून घेऊ म्हणजे थंडीचा त्रास होणार नाही. वॉटरप्रूफ कोट अथवा छत्री मागवून घेऊ म्हणजे पावसाचा त्रास होणार नाही. उत्तम वस्त्र-अलंकार आणि सौंदर्य प्रसाधन सामुग्री मागवून घेऊ त्यामुळे आपण खूप सुंदर दिसू लागू इत्यादी.

असे मनोरथ करीत असताना हे विसरूनच जातात की, आपण म्हातारे होऊ, त्यावेळी ह्या सामुग्रीचे काय करणार आणि मृत्युकाळी ही सामुग्री आपल्या काय कामी येईल? शेवटी या संपत्तीचा मालक कोण होईल? पुत्र तर कुपुत्र आहे म्हणून तो तर सर्व नष्ट करून टाकील. मृत्युकाळी ही धन-संपत्ती मला स्वत:ला दु:ख देईल. या सामुग्रीच्या लोभामुळेच मला मुला-मुलींची भीतीवाटते तसेच नोकरांनाही कदाचित ते संप न पुकारोत! म्हणून भ्यावे लागत आहे.

**प्रश्न—**दैवी-संपत्ती असलेल्या साधकांच्या मनातही कधी कधी व्यापार इत्यादींच्या कार्यसंबंधाने (या श्लोका-प्रमाणे) ''इतके काम झाले आहे, एवढे काम करावयाचे राहिले आहे आणि इतके काम पुढे होईल. इतका पैसा आलेला आहे आणि एवढा कर भरावयाचा आहे.'' इत्यादी स्फुरणा होतात. अशाच स्फुरणा जडतेचा उद्देश ठेवणाऱ्या आसुरी-संपत्ती असणाऱ्यांच्या मनातही होतात. तर मग त्या दोघांच्या वृत्तीत काय फरक झाला?

**उत्तर—**दोघांच्या वृत्ती एकसारख्या दिसत असल्या तरी त्यात फार मोठा फरक आहे. साधकाचा उद्देश परमात्म-प्राप्तीचा असतो, म्हणून तो त्या वृत्तीत तल्लीन नसतो. परंतु आसुरी-प्रकृती असणाऱ्यांचा उद्देश धनसंग्रह आणि भोग भोगणे हा असतो, म्हणून ते त्या वृत्तीत तल्लीन होतात. तात्पर्य, दोघांचा उद्देश भिन्न असल्यामुळे दोघात फार मोठा फरक आहे.

**परिशिष्ट भाव—**येथे भगवान् अकराव्या श्लोकात सांगितलेल्या 'कामोपभोगपरमा:' पदाची व्याख्या करतात.

## असौ मया हत: शत्रुर्हनिष्ये चापरानपि।
## ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी॥१४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **असौ** | = तो | | शत्रूंनाही (आम्ही) | **भोगी** | = भोग भोगणारे आहोत. |
| **शत्रु:** | = शत्रू तर | **हनिष्ये** | = मारून टाकू. | **अहम्** | = आम्ही |
| **मया** | = आमच्याद्वारा | **अहम्** | = आम्ही | **सिद्ध:** | = सिद्ध आहोत. |
| **हत:** | = मारला गेला | **ईश्वर:** | = ईश्वर (सर्वसमर्थ) आहोत. | **बलवान्** | = (आम्ही) मोठे बलवान् (आणि) |
| **च** | = आणि | | | | |
| **अपरान्, अपि** | = (त्या) दुसऱ्या | **अहम्** | = आम्ही | **सुखी** | = सुखी आहोत |

***व्याख्या—*** आसुरी-संपत्तीच्या व्यक्ती क्रोधपरायण होऊन अशा प्रकारचे मनोरथ करतात.

**असौ मया हत: शत्रु:—**तो माझ्या विरुद्ध चालत होता, माझ्याशी वैर करीत होता, त्याला तर मी मारून टाकले आहे आणि **'हनिष्ये चापरानपि'—**दुसरे जे असेच माझ्या विपरीत चालतात माझ्याशी वैर करतात, माझे अनिष्ट चिंतीतात, त्यांना ही अद्दल घडवीन, मारून टाकीन. **'ईश्वरोऽहम्'—**मी धन, बुद्धी, बल इत्यादीमध्ये सर्व तऱ्हेने समर्थ आहे. माझी बरोबरी कोण करू शकतो? **'अहं भोगी'—**मी भोग भोगणारा आहे. माझ्याजवळ स्त्री, घर, कार इत्यादी किती तरी भोगसामुग्री आहे. **'सिद्धोऽहम्'—**मी सर्व प्रकाराने सिद्ध आहे. मी तर पूर्वीच सांगितले होते ना? झाले की नाही तसेच? मला तर पूर्वीच जाणीव झाली होती की, जे लोक भजन, स्मरण, जप, ध्यान, इत्यादी करतात ते सर्व कोणाच्या तरी बहकाव्यात आली आहेत. म्हणून यांची काय दशा होणार आहे ते मला माहित आहे. माझ्यासारखा सिद्ध दुसरा कोणी संसारात आहे? मला अणिमा, गरिमा इत्यादी सर्व सिद्धी प्राप्त झाल्या आहेत. मी एका क्षणात सर्वांना भस्म करू शकतो. **'बलवान्'—**मी फार बलवान आहे. अमुक व्यक्तीने माझ्याशी टक्कर घेण्याची इच्छा केली, तर त्याचा काय परिणाम झाला? इत्यादी. परंतु ज्यावेळी ते स्वत: हारतात, ती गोष्ट दुसऱ्यांना सांगत नाहीत, की त्यामुळे कोणी त्यांना कमजोर समजू नये. त्यांना स्वत: हारल्याची गोष्ट स्मरणात राहत नाही परंतु अभिमानाची गोष्ट स्मरणात राहते. **'सुखी'—**माझ्याजवळ कितीतरी सुख आहे, आराम आहे. माझ्यासारखा सुखी संसारात कोण आहे?

अशा व्यक्तींच्या मनात तर ज्वलन होत असते परंतु वर वर बढाया मारीत असतात.

**परिशिष्ट भाव**—येथे भगवान् बाराव्या श्लोकात सांगितलेल्या '**कामक्रोधपरायणाः**' पदाची व्याख्या करतात.

आसुर स्वभाव असणाऱ्या मनुष्यांत 'आम्ही सुखी आहेत'—असा केवळ अभिमान असतो. वास्तविक ते सुखी नसतात. सुखी वास्तविक तोच आहे ज्यांच्यावर अनुकूलतेचा आणि प्रतिकूलतेचा परिणाम होत नाही (गीता—पाचव्या अध्यायाचा तेवीसाव्या श्लोक).

आसुर स्वभाव असणाऱ्या मनुष्यांजवळ बल काम आणि क्रोधाचेच असते. ते नाशवानाच्या संबंधाने स्वतःला बलवान् मानतात. हिरण्यकश्यपु इत्यादी सारखे ते स्वतःलाच सर्वोपरी मानतात. कारण दुसरे लोक त्यांना निकृष्ट दिसतात.

## आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया।
## यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः॥ १५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आढ्यः** | = आम्ही धनवान् आहोत, | **सदृशः** | = सारखे | **दास्यामि** | = दान देऊ (आणि) |
| **अभिजनवान्** | = पुष्कळ मनुष्य | **अन्यः** | = दुसरे | **मोदिष्ये** | = मौज करू— |
| **अस्मि** | आमच्या- जवळ आहेत, | **कः** | = कोण | **इति** | = अशाप्रकारे (ते) |
| **मया** | = आमच्या- | **अस्ति** | = आहे? | **अज्ञानविमोहिताः** | = अज्ञानाने मोहित राहतात. |
| | | **यक्ष्ये** | = (आम्ही) पुष्कळ यज्ञ करू, | | |

*व्याख्या*— आसुर स्वभावाचे लोक अभिमानपरायण होऊन पुढील प्रकारची मनोरथे करतात.

**आढ्योऽभिजनवानस्मि**—कितीतरी धन माझ्याजवळ आहे. कितीतरी सोने, चांदी, घरे, जमीन माझ्याजवळ आहे. माझ्या पक्षात कितीतरी चांगले लोक, उच्च पदाधिकारी आहेत. मी धन आणि जन यांच्या बळावर, लाच व शिफारस यांच्या बळावर वाटेल ते करू शकतो.

**कोऽन्योऽस्ति सदृशो मया**—आपण पुष्कळ प्रवास केला असेल, आपला कित्येकांशी संबंध आला असेल, पण सांगा, माझ्यासारखा आपणाला कोणी दिसला काय?

**यक्ष्ये दास्यामि**—मी असा यज्ञ करीन, असे दान देईन की, सर्व आश्चर्य चकित होतील. थोडे दान दिल्याने, एखादा लहान यज्ञ केल्याने, थोड्या ब्राह्मणांना भोजन घालण्याने काय होणार आहे? मी तर आजपर्यंत कोणी केले नसेल असे यज्ञ, दान करीन. कारण सामान्य यज्ञ, दान करण्याने मी यज्ञ केला, दान दिले म्हणून लोकात प्रसिद्धी कशी होईल? मोठा यज्ञ केला, खूप दान धर्म केला तर माझे नाव वृत्तपत्रातून प्रसिद्ध होईल. एखाद्या धर्मशाळेत मी खोल्या बांधीन, त्या खोल्यावर माझे नाव कोरीन त्यामुळे माझी स्मृती राहील.

**मोदिष्ये**—मी किती मोठा माणूस आहे. मला सर्व प्रकारची सर्व सामुग्री प्राप्त आहे. म्हणून मी आनंदाने मौज करीन.

अशा प्रकारे अभिमानाधीन होऊन मनोरथ करणारे आसुर लोक केवळ ''असे करू तसे करू'' असे बडबडत राहतात. वास्तविक करीत करवीत मात्र काहीच नाहीत. त्यांनी काही केले तरी ते केवळ नावासाठी! (ज्याचा उल्लेख पुढे सतराव्या श्लोकात आला आहे) कारण ''**इत्यज्ञानविमोहिताः**'' अशा प्रकारे तेराव्या, चौदाव्या आणि पंधराव्या श्लोकात वर्णित मनोरथ करणारे आसुर लोक अज्ञानाने मोहित राहतात अर्थात् मूढतेमुळेच त्यांची अशी मनोरथांची वृत्ती होते.

***संबंध***—*परमात्मविमुख आसुरी संपत्तीच्या लोकांना जिवंतपणी अशांती, ज्वलन, संताप इत्यादी तर असतेच परंतु मृत्यूनंतर त्यांची होणारी गती पुढील श्लोकात सांगतात.*

## अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः।
## प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ॥ १६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अनेकचित्त-** | = (कामनांमुळे) अनेक | **समावृताः** | फसून गेलेली (तसेच) | | राहणारी माणसे |
| **विभ्रान्ताः** | प्रकारे भ्रमित चित्त झालेली, | **कामभोगेषु** | = पदार्थ आणि भोग यात | **अशुचौ** | = भयंकर |
| | | | | **नरके** | = नरकांत |
| **मोहजाल-** | = मोहजाळ्यात पार | **प्रसक्ताः** | = अत्यन्त आसक्त | **पतन्ति** | = जातात. |

***व्याख्या*— अनेकचित्तविभ्रान्ताः**—त्या आसुरी माणसांचा एक निश्चय नसल्याने त्यांच्या मनात अनेक प्रकारच्या इच्छा निर्माण होतात आणि त्या एक एक इच्छापूर्तीसाठी अनेकानेक उपाय असतात. त्या उपायांविषयी त्यांचे अनेक प्रकारे चिंतन होते. त्यांचे चित्त कोणत्याही एका गोष्टीवर स्थिर राहत नाही, अनेक प्रकारे भटकत राहते.

**मोहजालसमावृताः**—जडाचा उद्देश असल्याने ते मोहजाळ्यात गुरफटलेले असतात. मोहजाळ्याचे तात्पर्य, तेराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत काम, क्रोध आणि अभिमान यांच्या आधारे जेवढी मनोरथे सांगितली आहेत त्या सर्वांनी ते चांगल्या रीतीने आवृत्त राहतात म्हणून ते त्यापासून कधी सुटत नाहीत. जसा मासा जाळ्यात अडकतो, तसे ते प्राणी मनोरथरूपी जाळ्यात अडकलेले राहतात. त्यांच्या मनोरथातही केवळ एकीकडेच वृत्ती राहत नाही, तर दुसरीकडेही वृत्ती राहते. जसे इतके धन तर मिळेल, पण त्यामध्ये जर अमुक-अमुक अडथळे आले तर? माझ्याजवळ इतकी बेकायदेशीर संपत्ती आहे. शासनाधिकाऱ्यास पत्ता लागला तर? माझे नोकर, मुनीम इत्यादी यांनी माझी तक्रार नोंदविली तर? मी अमुक व्यक्तीला ठार करीन, परंतु मारता न येता परिस्थिती उलटली तर? मी अमुकाचे नुकसान करीन परंतु त्याचेकडून माझी हानी झाली तर? अशा प्रकारे मोह जाळ्यात अडकलेल्या आसुरी संपत्तीच्या लोकात काम, क्रोध आणि अभिमान याबरोबर भीतीसुद्धा कायम राहते. म्हणून ते निश्चय करू शकत नाहीत. कोठे करायला जातात चांगले पण होते वाईट. मनोरथ सिद्ध न झाल्यामुळे त्यांना जे दुःख होते, ते त्यांचे त्यांनाच माहित!

**प्रसक्ताः कामभोगेषु**—वस्तू इत्यादींचा संग्रह करणे आणि त्याचा उपभोग करण्यात तसेच मान-सन्मान, सुख-आराम इत्यादीमध्ये ते अत्यंत आसक्त राहतात.

**पतन्ति नरकेऽशुचौ**—मोहजाळे त्यांच्यासाठी जिवंतपणीच नरक आहे आणि मृत्यूनंतर त्यांना कुम्भीपाक, महारौरव इत्यादी स्थान-विशेष नरकांची प्राप्ती होते. त्या नरकातही घोर यातना असलेल्या नरकात पडतात. ''**नरके अशुचौ**'' म्हणण्याचे तात्पर्य ज्या नरकात महान् असह्य यातना आणि भयंकर दुःख दिले जाते अशा घोर नरकात ते पडतात.* कारण ज्यांची जशी स्थिती असते, मृत्यूनंतरही त्यांची तशीच (स्थितीनुसार) गती होते.

**परिशिष्ट भाव**—वास्तविक आसुर मनुष्य काम-क्रोधपरायण असल्यामुळे पूर्वीपासूनच नरकात पडलेले आहेत आणि अभावरूपी अग्नीत जळत आहेत. परिणामी त्यांना भयंकर नरकांची प्राप्ती होते.

उच्चलोकांत अथवा नरकांत जाण्यात पदार्थ आणि क्रिया मुख्य कारण नाहीत, तर भाव मुख्य कारण आहे. भावाचे विशेष मूल्य आहे. जसा भाव असतो तशी क्रिया आपोआप होते. म्हणून भगवंताने आसुर मनुष्यांच्या भावांचे (मनोरथ इत्यादीचे) वर्णन केले आहे.

***संबंध*—** *भगवत्प्राप्तीच्या उद्देशापासून विमुख झालेल्या आसुरी संपत्तीच्या लोकांच्या दुराचारांचे फल नरक-प्राप्ती सांगून त्या दुराचारांनी पेरलेल्या दुर्भावामुळे वर्तमानात त्यांची किती भयंकर दुर्दशा होते आणि भविष्यात त्याचा काय परिणाम होतो, हे सांगण्यासाठी पुढील (चार श्लोकाचे) प्रकरण आरंभ करतात.*

**आत्मसम्भाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम्॥ १७॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **आत्मसम्भाविताः** | = स्वतःला सर्वात अधिक पूज्य मानणारी, | **धनमानमदान्विताः** | = धन व मान याच्या मदात चूर असणारी | **दम्भेन** | = दंभाने | | |
| **स्तब्धाः** | = अकड ठेवणारी तसेच | **ते** | = ती माणसे | **अविधिपूर्वकम्** | = अविधीपूर्वक | | |
| | | | | **नामयज्ञैः** | = नाममात्र यज्ञांनी | | |
| | | | | **यजन्ते** | = यजन करतात. | | |

***व्याख्या*—आत्मसम्भाविताः**—ते धन, मान-सन्मान, आदर इत्यादींच्या दृष्टीने स्वतः च्या मनानेच स्वतः आपल्याला मोठे मानतात, पूज्य समजतात की, माझ्यासारखा दुसरा कोणी नाही, म्हणून माझे पूजन झाले पाहिजे, माझा आदर, माझी प्रशंसा व्हावयास हवी. वर्ण, आश्रम, विद्या, बुद्धी, पद, अधिकार, योग्यता, इत्यादीमध्ये मी सर्व प्रकारे श्रेष्ठ आहे,

* नरकात जाणाऱ्या प्राण्यांना ''यातना शरीर'' मिळते. त्या यातना शरीराचे तुकडे तुकडे केले, तेलात टाकून उकळले, अग्नीत टाकून जाळले, तरी-ही ते मरत नाही. प्राणी जोपर्यंत आपल्या पाप कर्मांचे फल (दण्ड) भोगत नाही, तोपर्यंत भयंकर यातना झाल्या तरी ते शरीर मरत नाही.

म्हणून सर्व लोकांनी माझ्या अनुकूल चालावयास हवे.

**स्तब्धाः—**ते कोणासमोरही वाकत नाहीत, नम्र होत नाहीत. कोणी संत महात्मे अथवा अवतारी भगवंत समोर आले तरीही ते त्यांना नमस्कार करणार नाहीत. ते तर आपल्या स्वतःलाच श्रेष्ठ समजतात, मग कोणासमोर नम्र होतील आणि कोणाला नमस्कार करतील? एखाद्या कारणाने परवश होऊन लोकांसमोर वाकावे लागले तर अभिमानानेच वाकतील. अशा प्रकारे त्यांच्यात फार मोठी अक्कड असते.

**धनमानमदान्विताः—**ते धन आणि मानाच्या मदाने सदा चूर असतात त्यांच्यात धनाचा, आपल्या जनांचा, जमीन-जुमला आणि घर इत्यादींचा मद (नशा) असतो. मोठमोठ्या मंत्र्यांची सामान्य ओळख झाली तर त्याचाही यांच्या मनात मद चढतो की, माझी तर मंत्र्यापर्यंत ओळख आहे. माझ्याजवळ अशी शक्ती आहे ज्यामुळे वाटेल ते प्राप्त करू शकतो आणि वाटेल त्याचा नाश करू शकतो. अशा प्रकारे धन आणि मानच त्यांचा आधार असतो. त्यांचीच त्यांना धुंदी चढते. गरमी असते. म्हणून ते त्यांनाच श्रेष्ठ मानतात.

**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेन—**ते लोक (पंधराव्या श्लोकात आलेल्या "**यक्ष्ये दास्यामि**" पदानुसार) दम्भपूर्वक नाममात्र यज्ञ करतात. ते केवळ लोकांना दाखविण्यासाठी आणि आपले माहात्म्य वाढविण्यासाठीच यज्ञ करतात. तसेच या भावनेने करतात की, दुसऱ्यावर याचा प्रभाव पडावा आणि त्यांनी माझ्या प्रभावाने प्रभावित व्हावे त्यांचे डोळे उघडावे की, मी कुणीतरी आहे आणि माझी दहशत वाटावी, इत्यादी.

लोकात आपले नाव व्हावे, प्रसिद्धी व्हावी, आदर व्हावा यासाठी यज्ञाच्या नावावर आपल्या नावाचा खूप प्रचार करतील, आपल्या नावाच्या हस्तपत्रिका छापतील ब्राह्मणभोजन करतील. खिरीत कापूर टाकतील ज्यामुळे ते अधिक खाऊ शकणार नाहीत. कारण त्यामुळे खर्चही अधिक होणार नाही आणि नावही होईल. त्याचप्रमाणे पंक्तीत भोजनासाठी दोन-दोन, चार-चार, पाच-पाच द्रोण आणि पत्रावळी एकाच वेळी टाकतील. ज्यामुळे त्या द्रोण आणि पत्रावळींना बाहेर फेकल्यावर त्याचा ढीग लागेल आणि लोकांना असे वाटेल की, ही किती चांगली व्यक्ती आहे. ज्यांनी इतक्या ब्राह्मणांना भोजन करविले आहे. अशा प्रकारचे हे आसुरी-संपत्ती असणाऱ्याच्या अंतः-करणातील भाव असतात आणि त्या भावानुसारच त्यांचे आचरण होत असते.

आसुरी-संपत्तीयुक्त व्यक्ती शास्त्रोक्त यज्ञ, दान, पूजन इत्यादी कर्म तर करतात आणि त्यासाठी पैसाही खर्च करतात परंतु शास्त्रविधीची परवा न करता दम्भाने करतात.

मंदिरात जेव्हा एखादा महोत्सव असतो किंवा पर्वणी असते आणि जास्त लोक जमण्याची आशा असते तसेच मोठ-मोठे श्रीमान् लोक येणार असतील तर त्यावेळी जास्तीत जास्त लोकांनी यावे आणि त्यांनी देवतेपुढे मोठी देणगी, भेट वस्तू ठेवाव्यात—या उद्देशाने मन्दिराला सजवितात, मूर्तीला उत्तमोत्तम उंची वस्त्रे, दागिने घालतात. अशा प्रकारे भगवंताचे पूजन तर नाममात्र होते परंतु वास्तविक पूजन होते लोकांचे! त्याचप्रमाणे एखादा मंत्री अथवा एखादा उच्च अधिकारी येणारा असेल तर त्यांना खूश करण्यासाठी भगवंताला खूप सजवतील आणि जेव्हा ते मंदिरात येतील, तेव्हा त्यांचा खूप आदर सत्कार करतील. त्यांना भगवंताची माळ देतील, प्रसाद (जो त्यांच्यासाठी विशेषरूपाने तयार ठेवलेला असतो) देतील. यासाठी की, जर ते खूश झाले तर आपल्या व्यापारात, घरगुती कामात आपली साहाय्यता करतील, मुकदम्यात आपला पक्ष घेतील इत्यादी. या भावनेने ते भगवंताचे जे पूजन करतात ते तर त्यांचे नाममात्र पूजन असते. वास्तविक पूजन होत असते—आपल्या व्यापाराचे, घरगुती कामाचे, मुकदमाबाजीचे, कारण त्यांचा उद्देशच तो असतो.

गोरक्षणद्वारा गो सेवा करणारेही प्रायः दूध देणाऱ्या धष्ट पुष्ट गायींनाच ठेवतील आणि त्यांना अधिक चारा घालतील परंतु लंगड्या, वृद्ध, रोगी, आंधळया, दूध न देणाऱ्या गायींना ठेवणार नाहीत आणि समजा ठेवलेच तर त्यांना दूध देणाऱ्या गायीपेक्षा फार कमी चारा पाणी देतील. परंतु आपल्या गोशाळेत किती गोपालन होऊ लागलेले आहे या गोष्टीकडे लक्ष न देता केवळ लोकांना दाखविण्यासाठी त्याचा खोटा प्रचार करतील. प्रचारासाठी हस्तपत्रिका, पुस्तिका लेख, जहिरात यांचा अवलंब करतील, ज्यामुळे पैसा तर जास्त मिळावा आणि खर्च मात्र कमी व्हावा.

धार्मिक संस्थेमध्येही जे संचालक म्हणविले जातात ते प्रायः त्या धार्मिक संस्थांच्या पैशाने आपले घरगुती काम चालवितात. आपल्याला नफा कसा होईल, आपले दुकान कसे चालेल, पैसे कसे मिळतील—अशा प्रकारे आपल्या स्वार्थासाठी, केवळ देखाव्यासाठी सर्व कामे करतील.

प्रायः साधन-भजन करणारे लोकही दुसरा कोणी येत असलेला पाहून आसन लावून बसतील, भजन-ध्यान करू लागतील, माळ जपू लागतील. परंतु ज्यावेळी कोणी पाहणारा नसतो, त्यावेळी गप्पा मारत बसतील, पत्ते खेळतील अथवा झोपून जातील. असे जे साधन-भजन

होत असते, ते केवळ यासाठी की, दुसऱ्यांनी मला चांगले मानावे, भक्त मानावे आणि माझी प्रशंसा करावी, माझा आदर-सम्मान करावा, मला धनप्राप्ती व्हावी लोकांमध्ये माझे नाव रहावे, इत्यादी. अशा प्रकारे हे साधन भजन भगवंताचे तर नाममात्रासाठी होत असते, परंतु वास्तविक साधन-भजन होत असते आपल्या नावाचे, शरीराचे आणि पैशाचे! अशा प्रकारे आसुरी प्रकृतियुक्त असणाऱ्या बद्दल किती म्हणून सांगावे?

**अविधिपूर्वकम्**—ती आसुरी माणसे शास्त्रविधीला तर मानतच नाहीत, नेहमी शास्त्रनिषिद्ध काम करतात. ते यज्ञ, दान इत्यादी तर करतील पण ते विधीपूर्वक करणार नाहीत. दान देतील तर सुपात्राला न देता कुपात्राला देतील. कुपात्राशीच आत्मीयता ठेवतील. अशाप्रकारे उलट-सुलट काम करतील. त्यांची बुद्धी सर्वथा विपरीत असल्याकारणाने त्यांना उलटी गोष्टही सुलटीच दिसते—"**सर्वार्थान् विपरीतांश्च**" (१८।३२)

**परिशिष्ट भाव**—आसुर स्वभावाची माणसे दुसऱ्यांशी प्रतिस्पर्धा करतात आणि यासाठी यज्ञ करीतात की, दुसऱ्यांपेक्षा आपल्यात काही उणीव राहू नये, कोणी आम्हाला यज्ञ करणाऱ्यांपेक्षा निकृष्ट मानू नये. ते केवळ लोकांत आपली प्रसिद्धी होण्यासाठी यज्ञ करतात, फलावर विश्वास ठेवित नाहीत. दुसरी व्यक्ती यज्ञ करीत असेल तर ते असे समजतात की, तोही स्वतःच्या प्रसिद्धी साठी यज्ञ करीत आहे. ईश्वर आणि परलोक यांच्यावर विश्वास नसल्या कारणाने त्यांची दृष्टी विधीवर राहत नाही. विधीचा विचार तेच करीतात, जे ईश्वर आणि परलोक यांना मानतात की, अमुक कर्माचे अमुक फल मिळेल.

आसुर मनुष्यांचे सर्व प्रयत्न दिखावटी असतात. परंतु त्यांच्या अंतःकरणात अभिमान असतो की, आम्ही दुसऱ्यांपेक्षाही श्रेष्ठ यज्ञ करू. त्यांच्यात स्वतःच्या ज्ञानाचाही अभिमान असतो की, आम्ही समजदार आहोत, दुसरे सर्व मूर्ख आहेत, समजत नाहीत. वास्तविक त्यांच्यात केवळ मूर्खता भरलेली असते.

## अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः।
## मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः॥ १८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहङ्कारम्** | = (ती) अहंकार, | **संश्रिताः** | = आश्रय घेणारी माणसे | **माम्** | = मज अंतर्यामीशी |
| **बलम्** | = आग्रह, | | | **प्रद्विषन्तः** | = द्वेष करतात (तसेच) |
| **दर्पम्** | = घमेंड, | **आत्मपरदेहेषु** | = आपल्या आणि दुसऱ्यांच्या शरीरात (राहणाऱ्या) | **अभ्यसूयकाः** | = (माझ्या आणि दुसऱ्यांच्या गुणांत) दोष दृष्टी ठेवतात. |
| **कामम्** | = कामना | | | | |
| **च** | = आणि | | | | |
| **क्रोधम्** | = क्रोध यांचा | | | | |

*व्याख्या*—**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः**—ती आसुर माणसे जी काही कामे करतील, ती अहंकार, आग्रह, घमेंड, काम आणि क्रोधानेच करतील. जसा भक्त भगवंताच्या आश्रित राहतो, तसे ते आसुरलोक अहंकार, आग्रह, काम इत्यादींच्या आश्रित राहतात. त्यांची अशी दृढ धारणा असते की, अहंकार, आग्रह, घमेंड, कामना आणि क्रोध यांच्याशिवाय काम चालणार नाही. संसारात असे राहिले तरच काम चालते, नाहीतर मनुष्याला दुःख भोगावे लागते. जे यांचा (अहंकार, आग्रह इत्यादींचा) आश्रय घेत नाहीत ते समाजाकडून वाईट तऱ्हेने तुडविले जातात. साध्या-सरळ माणसांना संसारात कोण विचारतो? म्हणून अहंकारादी राहिल्यानेच आपला मान होईल, सत्कार होईल आणि लोकात नाव होईल, त्यामुळे लोकांवर आपला दबाव, अधिपत्य राहील.

**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तः**—भगवान् म्हणतात की, मी जो त्यांच्या शरीरात आणि दुसऱ्यांच्या शरीरात राहतो त्या माझ्याशी ते आसुर मनुष्य वैर करतात. भगवंताशी वैर करणे म्हणजे काय?

**"श्रुतिस्मृती ममैवाज्ञे य उल्लङ्घ्य प्रवर्तते।**
**आज्ञाभङ्गी मम द्वेषी नरके पतति ध्रुवम्॥"**

श्रुती आणि स्मृती ह्या दोन्ही माझ्या आज्ञा आहेत. यांचे उल्लंघन करून जो मनमानेल तसे वागतो, तो माझी आज्ञा भंग करून माझ्याशी द्वेष भाव ठेवणारा मनुष्य निश्चितच नरकात जातो.

ते आपल्या अंतःकरणात विद्यमान् असलेल्या परमात्म्याशीही विरोध करतात अर्थात् हृदयामध्ये ज्या योग्य स्फुरणा निर्माण होतात, सिद्धांताच्या सत् वृत्ती उत्पन्न होतात, त्यांचा तिरस्कार-उपेक्षा करतात, त्यांना मानीत नाहीत. ते

दुसऱ्या लोकांची अवज्ञा करतात, त्यांचा तिरस्कार करतात, अपमान करतात, त्यांना दुःख देतात, त्यांच्याशी भयंकर द्वेष करतात. हे सर्व त्या प्राण्यांच्या रूपात असलेल्या परमात्म्याशी द्वेष करणे आहे.

**अभ्यसूयकाः**—ते माझ्या आणि दुसऱ्यांच्या गुणात दोषदृष्टी ठेवतात. माझ्या विषयात ते म्हणतात की, "भगवान् फार पक्षपाती आहेत; ते भक्तांचे तर रक्षण करतात आणि दुसऱ्यांचा विनाश करतात, ही गोष्ट काही योग्य नाही. आजपर्यंत जितके संत महात्मे होऊन गेले आहेत आणि आत्ताही जे संत-महात्मा तसेच चांगल्या स्थितीत असलेले साधक, त्यांच्या विषयात ते आसुरलोक म्हणतात की, त्यांच्यातही राग-द्वेष, काम-क्रोध, स्वार्थ, दिखाऊपणा इत्यादी दोष आढळून येतात. कोण्याही संत महात्म्याचे चरित्र असे नाही, ज्यात हे दोष आले नाहीत. म्हणून हे सर्व पाखंड आहे. आम्हीही या सर्व गोष्टी करून पाहिल्या आहेत, आम्हीही संयम केला आहे, भजन केले आहे, व्रत केले आहे, तीर्थ केले आहेत, परंतु वास्तविक यात काही दम नाही. आम्हाला तर काहीही मिळाले नाही, फुकटच दुःख झाले. ते करण्यात आमचा वेळ मात्र विनाकारण वाया गेला आहे. ते लोकही कोणाच्या बहकाव्यात येऊन आपला वेळ बरबाद करीत आहेत. यावेळी ते अशा प्रवाहात वाहत आहेत आणि उलट्या मार्गावर चालत आहेत. आत्ता ते भानावर नाहीत. पण पुढे मागे जेव्हा भानावर येतील, तेव्हा त्यांनासुद्धा हे व्यर्थ असल्याचा अनुभव येईल." इत्यादी इत्यादी.

**परिशिष्ट भाव**—आसुरी प्रकृती असणारी माणसे आपली जिद्द सोडत नाहीत आणि स्वतःची गोष्ट हीच खरी मानतात. असा सिद्धान्त आहे की, जो स्वतः दुःखी असतो तोच दुसऱ्यांना दुःख देतो. आसुर मनुष्य स्वतः दुःखी राहतात म्हणून ते दुसऱ्यांनाही दुःख देतात. त्यांना कुठेही गुण दिसत नाही, तर दोषच दोष दिसतात. त्यांची अशी मान्यता असते की, सर्व काही चांगुलपणा आमच्यात आहे. त्यांना संसारात कोणता चांगला माणूस दिसतच नाही.

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान्।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु॥ १९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तान्** | = त्या | **संसारेषु** | = संसारात | **अजस्रम्** | = वारंवार |
| **द्विषतः** | = द्वेष करणाऱ्या, | **नराधमान्** | = महान् नीच, | **आसुरीषु** | = आसुरी |
| **क्रूरान्** | = क्रूर स्वभाव असणाऱ्या (आणि) | **अशुभान्** | = अपवित्र मनुष्यांना | **योनिषु, एव** | = योनीतच |
| | | **अहम्** | = मी | **क्षिपामि** | = टाकीत राहतो. |

*व्याख्या*— **तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान्**— सातव्या अध्यायाच्या पंधराव्या आणि नवव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात वर्णित आसुरी-संपत्तीचे, ह्या अध्यायाच्या सातव्या श्लोकापासून अठराव्या श्लोकापर्यंत विस्ताराने वर्णन केले गेले. आता त्या आसुरी-संपत्तीच्या विषयाचा या दोन (एकोणीसाव्या-वीसाव्या) श्लोकात उपसंहार करून भगवान् म्हणातात की, अशी आसुर माणसे विनाकारणच सर्वांशी वैर ठेवतात आणि सर्वांचे अनिष्ट करण्यावरच टपलेले असतात. त्यांची कर्म फार भयंकर क्रूर असतात, ज्यामुळे दुसऱ्यांची हिंसा इत्यादी होते. असे ते क्रूर, निर्दयी, हिंसक मनुष्य नराधम अर्थात् मनुष्यात महान् नीच आहेत "**नराधमान्**". त्यांना मनुष्यात नीच म्हणण्याचे तात्पर्य, नरकात राहणारे आणि पशु-पक्षी इत्यादी (चौऱ्यांशी लाख योनी) आपल्या पूर्व कर्मांचे फल भोगून शुद्ध होत आहेत आणि ही आसुर माणसे अन्याय-पाप करून पशु-पक्षी इत्यादी पेक्षाही खालच्या योनीत जात आहेत. म्हणून या लोकांचा संग फार वाईट म्हटला गेला आहे.

**बरु भल बास नरक कर ताता। दुष्ट संग जनि देइ बिधाता॥**
(मानस ५।४६।४)

नरकांचा वास फार चांगला आहे परंतु विधात्याने (ब्रह्मदेव) आम्हाला दुष्टांचा संग कधी देऊ नये. कारण नरकवासाने तर पाप नष्ट होऊन शुद्धी होते परंतु दुष्टांच्या संगाने अशुद्धी येते, पापे घडतात, पापाचे असे बी पेरले जाते की, जे पुढे नरक तसेच चौऱ्यांशी लाख योनी भोगूनही पूर्ण नष्ट होत नाही.

प्रकृतिअंश शरीराची आसक्ती अधिक झाल्यास आसुरी संपत्तीची वाढ होते. कारण भगवंतांनी कामनेला (राग) संपूर्ण पापांचा हेतू असल्याचे सांगितले आहे (३।३७). ती कामना अधिक वाढल्याने आसुरी-संपत्ती वाढतच जाते. जसे धनाची अधिक कामना वाढल्याने असत्य, कपट, छल इत्यादी दोष विषेशत्वाने वाढतात आणि वृत्तीतही अधिकाती अधिक धन कसे मिळेल—असा लोभ वाढत जातो. मग

मनुष्य अनुचित रीतीने, लपून छपून, चोरीने धन प्राप्तीची इच्छा करतो. यापेक्षाही लोभ अधिक वाढल्यास मग मनुष्य, दरोडे घालतो आणि थोड्या धनासाठी मनुष्याची हत्या करण्याला- ही मागे पुढे पाहत नाही. अशा प्रकारे त्याच्या ठिकाणी क्रूरता वाढत राहते आणि त्याचा स्वभाव राक्षसासारखा बनतो. स्वभाव बिघडल्यामुळे त्याचे पतन होत जाते आणि शेवटी त्याला कीट-पतंग इत्यादी आसुरी योनी आणि घोर नरकांच्या महान् यातना भोगाव्या लागतात.

**क्षिपाम्यजस्त्रमशुभानासुरीष्वेव योनिषु**—ज्यांचे नाव घेणे, दर्शन करणे, स्मरण करणे, इत्यादीही महान् अपवित्र करणारे असते "**अशुभान्**" अशा क्रूर, निर्दयी, सर्वांचे वैरी अशा माणसांच्या स्वभावानुसारच भगवान् त्यांना आसुरी योनी देतात. भगवान् म्हणतात-"**आसुरीष्वेव योनिषु क्षिपामि**" अर्थात् मी त्यांना त्यांच्या स्वभावालायकच कुत्रा, साप, विंचू वाघ, सिंह इत्यादी आसुरी योनीत टाकतो. तेही एक दोन वेळा नव्हे तर वारंवार टाकतो "**अजस्त्रम्**" ज्यामुळे ते कर्मफल भोगून शुद्ध होत जातील.

भगवान् त्यांना आसुरी योनीत टाकतात याचे तात्पर्य काय आहे?

भगवंताची त्या क्रूर, निर्दयी माणसांवरही आत्मीयता असते. भगवान् त्यांना परके समजत नाहीत, आपला द्वेषी-वैरी समजत नाहीत तर आपलेच आहेत असे समजतात. जसे, जो भक्त ज्याप्रमाणे भगवंताला शरण होतो, भगवान्ही त्यांना त्याचप्रमाणे आश्रय देतात (४।११). त्याचप्रमाणे जे भगवंताशी द्वेष करतात, त्यांच्याशी भगवान् द्वेष करीत नाहीत, उलट त्यांना आपलेच समजतात. सामान्य माणसे ज्याला आपले समजतात त्यांना जास्त सुख-आराम देऊन लौकिक सुखात फसवितात, परंतु भगवान् ज्यांच्याशी आत्मीयता करतात त्यांना शुद्ध करण्यासाठी ते प्रतिकूल परिस्थिती पाठवितात, ज्यामुळे ते नेहमीसाठी सुखी होतील, त्यांचा उद्धार होईल.

ज्याप्रमाणे हितैषी अध्यापक विद्यार्थ्यांना मारून-ठोकून शिकवितात, ज्यामुळे ते विद्वान होतील, उन्नत होतील, योग्य होतील, त्याचप्रमाणे जे प्राणी परमात्म्याला जाणत नाहीत, मानीत नाहीत आणि त्यांचे खंडन करतात, त्यांनाही परम कृपाळू भगवान् जाणतात, आपले मानतात आणि त्यांना आसुरी योनीत टाकतात त्यामुळे त्यांची झालेली पापे नाहीशी व्हावीत आणि ते शुद्ध, निर्मळ होऊन त्यांनी आपले कल्याण करून घ्यावे.

## आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि।
## मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्॥ २०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | **आसुरीम्** | = आसुरी | | अधिक |
| **मूढाः** | = (ते) मूढ मनुष्य | **योनिम्** | = योनीला | **अधमाम्** | = अधम |
| **माम्** | = मला | **आपन्नाः** | = प्राप्त होतात, | **गतिम्** | = गतीला अर्थात् भयंकर नरकांत |
| **अप्राप्य, एव** | = प्राप्त न करताच | **ततः** | = (नंतर) त्याहीपेक्षा | **यान्ति** | = जातात. |
| **जन्मनि जन्मनि** | = जन्म-जन्मांतरात | | | | |

***व्याख्या*— आसुरीं योनिमापन्ना....मामप्राप्यैव कौन्तेय**— मागील श्लोकात भगवंतांनी आसुर माणसांना वारंवार पशु-पक्षी इत्यादींच्या योनीत टाकतो असे म्हटले. आता तीच गोष्ट भगवान् पुन्हा सांगतात की, मनुष्यजन्मात मला प्राप्त करून घेण्याचा दुर्लभ अवसर मिळूनही ती आसुर माणसे माझी प्राप्ती न करता पशु-पक्षी इत्यादी आसुरी योनीत जातात आणि वारंवार त्या आसुरी योनीतच जन्म घेतात.

**मामप्राप्यैव**—या पदाने भगवान् पश्चात्तापपूर्वक म्हणत आहेत की, अत्यंत कृपा करून मी जीवांना मनुष्यशरीर देऊन यांना आपला उद्धार करण्याची संधी दिली आणि असा विश्वास केला की, हे आपला उद्धार अवश्य करून घेतील. परंतु हे नराधम इतके मूढ आणि विश्वासघातकी निघाले की, ज्या शरीराने माझी प्राप्ती करावयाची होती, ती करून न घेता उलट अधम गतीला गेले.

मनुष्यशरीर प्राप्त झाल्यास तो कशाही आचरणाचा का असेना अर्थात् दुराचाराती दुराचारी का असेना, तो जर इच्छिल तर थोड्याच काळात (९।३०-३१) आणि जीवनाच्या अंतकाळीही (८।५) भगवंताला प्राप्त करू शकतो. कारण "**समोऽहं सर्वभूतेषु**" (९।२९) म्हणून भगवंतांनी आपली प्राप्ती सर्वांसाठी अर्थात् प्राणीमात्रांसाठी खुली ठेवली आहे. हां, ही गोष्ट होऊ शकते की, पशु-पक्षी इत्यादीत त्यांना प्राप्त करण्याची योग्यता नाही, परंतु भगवंताकडून तर कोणासाठीही मनाई नाही. अशी संधी सर्वथा प्राप्त होऊनही ही आसुर माणसे भगवंताला प्राप्त न करता अधोगतीला जातात, तर यांच्या या दुर्गतीला पाहून परम दयाळू प्रभू दुःखी होतात.

**ततो यान्त्यधमां गतिम्**—आसुरी योनीत गेल्यावरही त्यांची सर्व पापे पूर्ण नष्ट होत नाहीत. म्हणून बाकी राहिलेल्या पापांना भोगण्यासाठी ते त्या आसुर योनीपेक्षाही भयंकर अधम गतीला अर्थात् नरकाला प्राप्त होतात.

**शंका**—आसुरी योनीला प्राप्त झालेल्या माणसांना तर त्या योनीत भगवंताला प्राप्त करण्याचा अवसरच नाही आणि त्यांच्या ठिकाणी ती योग्यताही नाही. मग भगवंतांनी असे का म्हटले की, ते मला प्राप्त न करता त्यापेक्षाही अधम गतीला जातात?

**समाधान**—भगवंताचे असे म्हणणे हे आसुरी योनीला प्राप्त होण्यापूर्वी असलेल्या मनुष्यशरीराला अनुसरूनच आहे. तात्पर्य, मनुष्यशरीराला प्राप्त करून, माझ्या प्राप्तीचा अधिकार असतानाही ती माणसे माझी प्राप्ती न करता जन्मजन्मान्तरात आसुरी योनींना प्राप्त होतात. एवढेच नव्हे तर, ते त्या आसुर योनीपेक्षाही अधम अशा कुम्भीपाक इत्यादी घोर नरकात जातात.

**विशेष गोष्ट**

भगवत्प्राप्ती अथवा कल्याणाच्या उद्देशाने दिल्या गेलेल्या मनुष्यशरीराला प्राप्त करूनही माणसे कामना, स्वार्थ तसेच अभिमानाला वश होऊन चोरी, दरोडे, असत्य, कपट, धोका, विश्वासघात, हिंसा इत्यादी जी कर्म करतात, त्यांचे दोन परिणाम होतात. (१) बाह्य फल अंश (२) आंतरिक संस्कार अंश. दुसऱ्यांना दुःख दिल्याने त्यांचे (ज्यांना दुःख दिले गेले आहे) तर तेच नुकसान होते, जे त्यांच्या प्रारब्धाने होणारे असते, परंतु जे दुःख देतात, ते नवीन पाप करतात, ज्याचे फल नरक हे त्यांना भोगावेच लागते. एवढेच नव्हे तर दुराचाराद्वारा जे नवीन पाप होण्याचे बीज पेरले जाते अर्थात् त्या दुराचाराद्वारा अहंतेत जे दुर्भाव पक्के बसतात, त्यापासून मनुष्याचे फार भयंकर नुकसान होत असते. ज्याप्रमाणे चोरीरूप कर्म करण्यापूर्वी मनुष्य स्वतःचोर बनतो कारण तो चोर बनूनच चोरी करेल आणि चोरी केल्याने स्वतःत (अहंतेत) चोरीचा भाव दृढ होईल* अशा प्रकारे चोरीचे संस्कार त्याच्या अहंतेत बसतात. हे संस्कार मनुष्याचे फार मोठे पतन करतात—त्याचेकडून पुन्हा पुन्हा चोरीरूप पाप करवितात आणि फलस्वरूप नरकात घेऊन जातात. म्हणून जोपर्यंत तो मनुष्य आपले कल्याण करून घेत नाही अर्थात् जोपर्यंत तो आपल्या अहंतेत बसलेल्या दुर्भावांना मिटवीत नाही, तोपर्यंत ते दुर्भाव जन्मजन्मातरांपर्यंत दुराचारांना बळ देत राहतात, प्रवृत्त करीत राहतात आणि त्यामुळे ते आसुरी योनीत तसेच त्यापेक्षाही भयंकर नरक इत्यादीमध्ये दुःख, संताप, संकट इत्यादी प्राप्त करीत राहतात.

त्या आसुरी योनीतही त्यांच्या प्रकृती आणि प्रवृत्तीनुसार असे दिसून येते की, कित्येक पशु-पक्षी, भूत-पिशाच, कीट पतंग इत्यादी सौम्य-प्रकृतीप्रधान असतात आणि कित्येक क्रूर-प्रकृतीप्रधान असतात. अशा तऱ्हेने त्यांच्या प्रकृतीत (स्वभाव) भेद त्यांनी स्वतः बनविलेल्या शुद्ध किंवा अशुद्ध अहंतेमुळेच होतो. म्हणून त्या योनीत आपापल्या कर्मांचा भोग असूनही त्यांच्या प्रकृतीत भेद कायमच राहतात. एवढेच नव्हे तर संपूर्ण योनीं, नरकांना भोगल्यानंतर एखाद्या क्रमाने अथवा भगवत्कृपेने त्यांना मनुष्यशरीर प्राप्तही झाले तरीही त्यांच्या अंहतेत बसलेले काम क्रोधादी दुर्भाव पूर्वीसारखेच राहतात.† त्याचप्रमाणे जे स्वर्गप्राप्तीच्या कामनेने येथे शुभ कर्म करतात आणि मृत्यूनंतर त्या कर्मानुसार स्वर्गात जातात. तेथे त्यांच्या कर्मांचा फलभोग तर होतो परंतु त्यांच्या स्वभावात परिवर्तन होत नाही अर्थात् त्यांच्या अहंतेत परिवर्तन होत नाही.‡ स्वभाव बदलण्याची, शुद्ध करण्याची संधी तर मनुष्यशरीरातच आहे.

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, हे जीव मनुष्यशरीरात, माझ्या प्राप्तीचा अवसर प्राप्त करूनही मला प्राप्त करीत नाहीत, म्हणून मला त्यांना अधम योनीत टाकावे लागते. त्यांचे अधम योनीत आणि अधम गतीत (नरक) जाण्याचे मूळ कारण काय आहे. हे भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

---

* दुर्भावांनी दुराचार उत्पन्न होतात आणि दुराचाराने दुर्भाव पुष्ट होतात.

† अत्यन्तकोपः कटुका च वाणी दरिद्रता च स्वजनेषु वैरम्। नीचप्रसङ्गः कुलहीनसेवा चिन्हानि देहे नरकस्थितानाम्। (चाणक्यनीति ७।१७)
नरकातून आलेल्या लोकात ही लक्षणे असतात-अत्यन्त क्रोध, कटुवचन बोलणे, दरिद्रता, स्वजनांशी वैर, नीच संगती आणि कुलहीनाची (नीच) सेवा.
कार्पण्यवृत्तिः स्वजनेषु निन्दा कुचैलता नीचजनेषु भक्तिः। अतीव रोषः कटुका च वाणी नरस्य चिन्हं नरकागतस्य॥ (पद्मपुराण सृष्टि० ५१।१३२)

‡ स्वर्गस्थितानामिह जीवलोके चत्वारि चिह्नानि वसन्ति देहे। दानप्रसङ्गो मधुरा च वाणी देवार्चनं ब्राह्मणतर्पणं च॥ (चाणक्यनीति ७।१६)
स्वर्गातून मनुष्य लोकात परत आलेल्या लोकांच्या देहात चार लक्षणे असतात—दानप्रवृत्ती, मधुर वचन, देवतापूजन आणि ब्राह्मणांना संतुष्ट करणे.
(स्वर्गस्थितानामिह जीवलोके चत्वारि तेषां हृदये वसन्ति। दानं प्रशस्तं मधुरा च वाणी देवार्चनं ब्राह्मणतर्पणं च॥)
(पद्मपुराण, सृष्टि० ५१।१३१)

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्॥ २१॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **कामः** | = काम, | **त्रिविधम्** | = तीन प्रकाराचे | **तस्मात्** | = म्हणून |
| **क्रोधः** | = क्रोध | **नरकस्य** | = नरकाचे | **एतत्** | = या |
| **तथा** | = आणि | **द्वारम्** | = दरवाजे | **त्रयम्** | = तिन्हींचा |
| **लोभः** | = लोभ— | **आत्मनः** | = जीवात्म्याचे | **त्यजेत्** | = त्याग |
| **इदम्** | = हे | **नाशनम्** | = पतन करणारे आहेत, | | केला पाहिजे. |

*व्याख्या*—**कामः क्रोधस्तथा लोभस्त्रिविधं नरकस्येदं द्वारम्**—भगवंतांनी पाचव्या श्लोकात म्हटले होते की, दैवी- संपत्ती मोक्षासाठी आणि आसुरी-संपत्ती बंधनासाठी आहे तर ती आसुरी-संपत्ती कोठून येते? जेथे संसाराची कामना असते! संसाराच्या भोगपदार्थांचा संग्रह, मान, सन्मान, आराम, इत्यादी जे बरे वाटतात, त्यांच्या ठिकाणी जी महत्त्वबुद्धी अथवा आकर्षण असते, बस, तेच मनुष्याला नरकाकडे घेऊन जाणारे असते. म्हणून काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर हे षड्रिपू मानले गेले आहेत. यापैकी कुठे तीघांचे, कुठे दोघांचे आणि कुठे एकाचे कथन केले जाते, परंतु ते सर्व एकमेकाशी मिळालेलेच असतात, एकाच धातूचे असतात. या सर्वात कामच मूळ आहे. कारण कामनेमुळेच मनुष्य बांधला जातो (५।१२)

तीसऱ्या अध्यायाच्या छत्तीसाव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले होते की, मनुष्य इच्छा नसतानाही पापाचे आचरण का करतो? त्याच्या उत्तरात भगवंतांनी काम आणि क्रोध हे दोन शत्रू सांगितले. परंतु त्या दोन्हीतही ''**एष**'' शब्द देऊन कामनेलाच मुख्य सांगितले, कारण कामनेत विघ्न आल्यास क्रोध उत्पन्न होतो. येथे काम, क्रोध, लोभ हे तीन शत्रू आहेत असे सांगतात. तात्पर्य, भोगाकडे वृत्तींचे असणे ''काम'' आहे आणि संग्रहाकडे वृत्तींचे असणे ''लोभ'' आहे. जेथे ''काम'' शब्द एकटा येतो, तेथे त्याच्या अंतर्गतच भोग आणि संग्रह याची इच्छा येते. परंतु जेथे ''काम'' आणि ''लोभ'' दोन्ही स्वतंत्ररूपाने येतात, तेथे भोगाच्या इच्छेच्या अनुषंगाने ''काम'' आणि संग्रहाच्या इच्छेच्या अनुषंगाने ''लोभ'' येतो आणि या दोघात बाधा आली असता ''क्रोध'' येतो. जेव्हा काम, क्रोध, लोभ तिन्हीही अधिक वाढतात तेव्हा ''मोह'' होतो.

कामापासून क्रोध उत्पन्न होतो आणि क्रोधापासून सम्मोह होतो (२।६२-६३). जर कामनेत बाधा पडली नाही तर लोभ उत्पन्न होतो आणि लोभाने सम्मोह होतो. वास्तविक हा ''काम'' च क्रोध आणि लोभाचे रूप धारण करतो. सम्मोह झाल्यास तमोगुण येतो. मग तर पूर्ण आसुरी-संपत्ती येते.

**नाशनमात्मनः**—काम, क्रोध आणि लोभ हे तिन्ही मनुष्याचे पतन करणारे आहेत. ज्यांचा उद्देश भोग भोगणे आणि संग्रह करणे असतो, ते लोक (स्वतःच्या समजूतीने) आपली उन्नती करून घेण्यासाठी ह्या तिन्ही दोषांना हितकारी मानतात. त्यांचा हाच भाव राहतो की, आम्ही कामादिकांने सुख मिळवू, आरामाने राहू, खूप भोग भोगू, हा भावच त्यांचे पतन करतो.

**तस्मादेतत्त्रयं त्यजेत्**—हे काम, क्रोध इत्यादी नरकाचे दरवाजे आहेत. म्हणून मनुष्याने यांचा त्याग करावा. यांचा त्याग कसा करावा? तीसऱ्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी सांगितले आहे की, प्रत्येक इंद्रियांच्या विषयात अनुकूलता-प्रतिकूलता यांच्या अनुरोधाने राग (काम) आणि द्वेष (क्रोध) स्थित राहतात. साधकाने यांना वशीभूत होऊ नये. वशीभूत न होण्याचा अर्थ काम, क्रोध, लोभ यांच्या अधीन होऊन कोणतेही कार्य करू नये. कारण यांच्या अधीन होऊन शास्त्र, धर्म आणि लोकमर्यादेविरुद्ध कार्य करण्याने मनुष्याचे पतन होते.

**परिशिष्ट भाव**—भोग भोगणे 'काम' आहे. संग्रह करणे 'लोभ' आहे. भोग आणि संग्रहात बाधा ठेवणाऱ्यावर 'क्रोध' येतो. हे तिन्ही आसुरी-संपत्तीचे मूळ आहेत. सर्व पापे या तिन्हीपासूनच होतात.

व्यक्ती आणि पदार्थ तर इथेच राहून जातात, परंतु अंतःकरणातील भाव आसुर मनुष्यांना नरकांत घेऊन जातो.

***संबंध***—*आता भगवान् काम, क्रोध, लोभरहित होण्याचे माहात्म्य सांगत आहेत.*

**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम्॥ २२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | | झालेला | | करतो, तो |
| **एतैः** | = या | **नरः** | = (जो) मनुष्य | **ततः** | = त्यामुळे |
| **त्रिभिः,** | = नरकाच्या तिन्ही | **आत्मनः** | = आपल्या | **परम्** | = परम |
| **तमोद्वारैः** | दरवाजाहून | **श्रेयः** | = कल्याणाचे | **गतिम्** | = गतीला |
| **विमुक्तः** | = रहित | **आचरति** | = आचरण | **याति** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*— **एतैर्विमुक्तः कौन्तेय......ततो याति परां गतिम्**—पूर्व श्लोकात जी नरकाची द्वारे सांगितली गेली आहेत, त्याच काम, क्रोध, लोभ, यांना येथे ''तमोद्वार'' म्हटले गेले आहे. ''**तम**'' अन्धकाराला म्हणतात, जो अज्ञानाने उत्पन्न होतो ''**तमस्त्वज्ञानजं विद्धि**'' (१४।८) तात्पर्य, या कामामुळे ''माझ्याबरोबर ही धन-संपत्ती, स्त्री-पुरुष, घर-परिवार इत्यादी पूर्वीही नव्हते आणि नंतरही राहणार नाहीत आणि आत्ता यांच्याशी प्रत्येक क्षणाला वियोग होत आहे, म्हणून यांच्याविषयी ममता केल्यास माझी काय दशा होईल?'' इत्यादी गोष्टींकडे दृष्टी जातच नाही अर्थात् बुद्धीत अंधकार पसरलेला असतो. म्हणून या कामादिकापासून मुक्त होऊन जो आपल्या कल्याणाचे आचरण करतो, तो परमगतीला प्राप्त होतो. म्हणून साधकाने विशेषत्वाने काम, क्रोध, लोभ या तिन्हीपासून नेहमी सावध रहावे. कारण ह्या तिन्हीला कायम ठेवून जो साधन करतो, तो वास्तविक खरा साधकच नव्हे. खरा साधक तो असतो, जो या दोषांना आपल्याजवळ थारा देत नाही. हे दोष त्याला नेहमी खटकत राहतात कारण यांना जवळ राहण्याची संधी देणे ही फार मोठी चूक आहे.

माणसे साधनेकडे तर लक्ष देतात परंतु आपल्यात जे काम-क्रोधादी दोष आहेत, त्याचेकडे ते लक्ष कमी देतात. ह्या उणीवेमुळेच साधन करताना सदाचाराबरोबर दुराचारही होत राहतात, सद्गुणाबरोबरच दुर्गुणही येत राहतात. जप, ध्यान, कीर्तन, सत्संग, स्वाध्याय, तीर्थ व्रत इत्यादी करून आपल्याला शुद्ध करून घेऊ, असा भाव साधकात विशेष राहतो. परंतु जे आपल्याला अशुद्ध करत आहेत, त्या दुर्गुण-दुराचारांना हटविण्याकडे साधकाचे लक्ष कमी राहते-म्हणून—

**आसुप्तेरामृते कालं नयेद् वेदान्तचिन्तया ।**
**न वा दद्यादवसरं कामादीनां मनागपि॥**

जागे झाल्यापासून पुन्हा झोप येईपर्यंत आणि ज्या दिवसापासून कळू लागेल त्या दिवसापासून मरेमर्यंत सर्वचा सर्वकाळ परमात्मतत्त्वाच्या (सगुण-निर्गुण) चिंतनामध्येच घालवावा. चिंतनाशिवाय कामादिकास किंचितही संधी देऊ नये.

**एतैर्विमुक्तः**—याचा अर्थ असा नाही की, जेव्हा आपण या दुर्गुण-दुराचारापासून पूर्णपणे मुक्त होऊ, तेव्हा साधन करू, उलट साधकाने भगवत्प्राप्तीचा मुख्य उद्देश ठेवून यांच्यापासून सुटण्याचेसुद्धा लक्ष्य असू द्यावे. कारण असत्य, कपट, बेईमानी, काम, क्रोध इत्यादी आपल्याबरोबर राहतील तर नव-नव्या अशुद्धी, नव-नवी पापे होत राहतील, ज्यामुळे साधनेचा प्रत्यक्ष लाभ होणार नाही. याच कारणामुळे अनेक वर्षे साधन करीत राहूनही साधकाला आपली वास्तविक उन्नती दिसून येत नाही. त्यांना आपल्यात विशेष परिवर्तनाचा अनुभव येत नाही. या दोषांनी रहित झाल्यास शुद्धी स्वतः स्वाभाविक येते. जीवामध्ये अशुद्धी तर संसाराकडे लागल्यानेच आलेली आहे, नाहीतर परमात्म्याचा अंश असल्याने तो तर स्वतःच शुद्ध आहे—

**ईस्वर अंस जीव अबिनासी।**
**चेतन अमल सहज सुखरासी॥**

(मानस ७।११७।१)

**श्रेयः आचरति**—याचे तात्पर्य, काम, क्रोध आणि लोभ—यापैकी कोणाचाही अंगीकार करून आचरण करता कामा नये अर्थात् असाधनरहित (निषिद्ध आचरण) शुद्ध साधन केले पाहिजे. अंतःकरणात कधी कोणती वृत्ती उत्पन्न जरी झाली तरी त्याला आचरणात आणता कामा नये. आपल्याकडून तर (काम-क्रोधादिकांच्या) वृत्तींना दूर करण्याचाच प्रयत्न करावा. जर आपल्या प्रयत्नाने दूर झाल्या नाहीत तर ''हे नाथ! हे नाथ! हे नाथ!'' असे भगवंतांना पुकारावे. गोस्वामी तुलसीदासजी महाराज म्हणतात—

**मम हृदय भवन प्रभु तोरा। तहँ बसे आइ बहु चोरा॥**
**अति कठिन करहिं बरजोरा। मानहिं नहिं बिनय निहोरा॥**

(विनयपत्रिका १२५।२-३)

**परिशिष्ट भाव—'एतैर्विमुक्तः'**—काम, क्रोध, लोभ यापासून रहित होण्याचे तात्पर्य आहे—यांच्या त्यागाचा उद्देश ठेवणे, यांच्या ताब्यात न होणे. कामाने, लोभाने अथवा लोभाने केले गेलेले शुभकर्मसुद्धा कल्याणाकरक होत नाही. म्हणून यांच्या त्यागाकडे विशेष लक्ष पुरवावे. काम-क्रोध-लोभ यांना पकडून राहल्याने कल्याणाचे आचरण (जप, ध्यान इत्यादी) करूनही कल्याण होत नाही. कारण हे संपूर्ण पापाला कारणीभूत आहेत (गीता—तीसऱ्या अध्यायाचा सदतीसावा श्लोक).

काम-क्रोध-लोभ यांच्यामुळे धर्म आणि समाजमर्यादा नष्ट होते, ज्यामुळे जगताचे फार मोठे अहित होते. आसुरी स्वभाव असणारे मनुष्य काम-क्रोध-लोभ यांचे परायण असतात. ते यज्ञ, दान इत्यादी सर्व शुभकर्म केवळ प्रसिद्धीसाठी करतात, आपल्या कल्याणासाठी काही करीत नाहीत. परंतु दैवी-संपत्ती असणारे साधक काम-क्रोध-लोभ यांना वश न होता आपल्या कल्याणाचे आचरण करतात, ज्यामुळे जगताचे आपोआप हित होते. आसुरी मनुष्य अशा साधकांना मूर्ख समजतात आणि त्यांच्याशी द्वेष करतात. परंतु या साधकांना त्या आसुरी मनुष्यावर दया उपजते आणि ते त्यांना सद्बुद्धी देण्यासाठी भगवंताला प्रार्थना करतात.

***संबंध—*** *जे आपल्या कल्याणासाठी शास्त्रविधीनुसार चालतात त्यांना तर परमगतीची प्राप्ती होते, परंतु जे असे न करता मनास वाटेल तसे आचरण करतात, त्यांची होणारी गती पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
## न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्॥ २३॥

**यः** = जो मनुष्य
**शास्त्रविधिम्** = शास्त्रविधीला
**उत्सृज्य** = डावलून
**कामकारतः** = आपल्या इच्छेने मनमाने
**वर्तते** = आचरण करतो,
**सः** = त्याला
**सिद्धिम्, न,** = सिद्धीही (अंतः-
**अवाप्नोति** करणाची शुद्धीही) (प्राप्त होत नाही)
**सुखम्, न** = सुखही (शांतीही) मिळत नाही (आणि)
**पराम्** = परम
**गतिम्** = गतीही
**न, अवाप्नोति** = प्राप्त होत नाही.

***व्याख्या—*** सतराव्या अध्यायाचा अठ्ठावीसावा श्लोक देखील याच्याशी मिळता जुळता आहे.

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते**—जे लोक शास्त्रविधीची अवहेलना करून शास्त्रविहित यज्ञ करतात, दान करतात, परोपकार करतात, जगाच्या लाभासाठी निरनिराळी कित्येक चांगली कामे करतात परंतु ती सर्व करतात "**कामकारतः**"† अर्थात् शास्त्रविधीला लक्षात न घेता आपल्या मनमानी पद्धतीने करतात. वाटेल तसे करण्याचे कारण हे आहे की, त्यांच्या अंतःकरणात जे काम, क्रोधादी दोष वास्तव्य करतात त्यांची परवा न करता ते बाह्य आचरणानीच स्वतःला मोठे समजतात. तात्पर्य, ते बाह्य आचरणालाच श्रेष्ठ समजतात. दुसरे लोकही बाह्य आचरणालाच विशेषतेने पाहतात. अंतःकरणातील भावांना, सिद्धांतांना जाणणारे लोक फार कमी असतात. परंतु वास्तविक अंतः-करणाच्या भावानाच विशेष महत्त्व आहे.

जर अंतःकरणात दुर्गुण-दुर्भाव असतील आणि बाहेरुन मोठे त्यागी तपस्वी बनले तर अभिमानी होऊन दुसऱ्यांचा अवमान करतात. अशा प्रकारे अंतःकरणात वाढलेल्या देहाभिमानामुळे त्यांचे गुणसुद्धा दोषात परिणत होतात. त्यांचा महिमा निंदेत परिणत होतो. त्यांचा त्याग रागात, आसक्तीत, भोगात परिणत होतो आणि शेवटी त्यांचे पूर्ण पतन होते. म्हणून अंतःकरणात दोष राहिल्यानेच ते शास्त्रविधीचा त्याग करून वाटेल तसे आचरण करतात.

जसे रोगी आपल्या दृष्टीने तर कुपथ्याचा त्याग आणि पथ्य सेवन करतो, परंतु तो आसक्तीवश कुपथ्य सेवन करतो, त्यामुळे त्याचे स्वास्थ्य अधिक बिघडते. तसेच हे लोक आपल्या दृष्टीने चांगली कामे करतात, परंतु अंतःकरणात काम, क्रोध आणि लोभ यांचा आवेश असल्यामुळे ते शास्त्रविधीची अवहेलना करून वाटेल त्या पद्धतीने काम करू लागतात, त्यामुळे ते अधोगतीला जातात.

**न स सिद्धिमवाप्नोति**—आसुरी संपत्तीचे लोक शास्त्र विधीचा त्याग करून जे यज्ञादी शुभ कर्म करतात,

† (अ) येथे आलेले "कामकारतः वर्तते" (शास्त्रविधीची अवहेलना करून मनास वाटेल त्याप्रकारे वर्तन करतो) आणि पाचव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात आलेले "कामकारेण फले सक्तः" (भोगांच्या, पदार्थांच्या इच्छेने फलात आसक्त झालेला)—ह्या दोन्हीत थोडा फरक आहे. "कामकारतः" मध्ये क्रिया करण्यात उच्छृंखल वृत्ती आहे आणि "कामकारेण" मध्ये भोगांची इच्छा आहे. तात्पर्य, "कामकारतः" ची दृष्टी क्रियेकडे आहे आणि "कामकारेण" ची दृष्टी क्रियेच्या परिणामावर (फल) आहे की, परिणामी मला अमुक फल मिळेल. परंतु दोन्हीमध्ये मूळ कारण तर "काम" च आहे.

(ब) लक्षात घेण्यासारखी एक गोष्ट अशी आहे की, सातव्या श्लोकापासून तेवीसाव्या श्लोकापर्यंत ज्या आसुरी-संपत्तीचे वर्णन झाले आहे, त्यामध्ये एकूण नऊ वेळा "काम" शब्द आला आहे. जसे (१) "कामहैतुकम्" (१६। ८), (२) "काममाश्रित्य" (१६। १०), (३) "कामोपभोगपरमाः" (१६। ११), (४) "कामक्रोधपरायणाः" (१६। १२), (५) "कामभोगार्थम्" (१६। १२), (६) "कामभोगेषु" (१६। १६), (७) "कामम्" (१६। १८), (८) "कामः" (१६। २१) आणि (९) "कामकारतः" (१६। २३). यावरुन ही गोष्ट सिद्ध होते की, आसुरी-संपत्तीचे मूळ कारण "काम" अर्थात् कामनाच आहे.

त्यांना धन, मान, आदर इत्यादीच्यारूपात काही प्रसिद्धीरूप सिद्धी मिळू शकते, परंतु वास्तविक अंत:करणाची शुद्धीरूप जी सिद्धी असते ती त्यांना मिळत नाही.

**न सुखम्**—त्यांना सुखही मिळत नाही. कारण त्यांच्या अंत:करणात काम क्रोधादी ज्वलन कायम राहते. पदार्थांच्या संयोगाने होणारे सुख त्यांना मिळू शकते, परंतु ते सुख दु:खालाच कारण होते अर्थात् त्या सुखापासून दु:खच दु:ख उत्पन्न होतात. (५।२२) तात्पर्य पारमार्थिक मार्गात मिळणारे सात्त्विक सुख त्यांना मिळत नाही.

**न परां गतिम्**—त्यांना परमगतीही मिळत नाही. परमगती मिळेलच कशी? पहिली गोष्ट तर ते, परमगतीला मानतच नाहीत आणि समजा मानलीच तर ती त्यांना मिळू शकत नाही. कारण काम, क्रोध आणि लोभामुळे त्यांची कर्मच तशी होतात.

सिद्धी, सुख आणि परमगती न मिळण्याचे तात्पर्य, ते आचरण तर श्रेष्ठ करतात, ज्यामुळे त्यांना ह्या सिद्धी, सुख आणि परमगतीची प्राप्ती होऊ शकेल, परंतु अंत:करणात काम, क्रोध, लोभ आणि अभिमान इत्यादी राहिल्याने त्यांची चांगली आचरणेसुद्धा वाईटात रुपांतरित होतात. म्हणून त्यांना वरील गोष्टी मिळत नाहीत. जर असे मानले की, त्यांची आचरणेच वाईट असतात तर भगवंताचे **"न स सिद्धि- मवाप्नोति न सुखं न परां गतिम्"** असे म्हणणे सयुक्तिक ठरणारच नाही. कारण प्राप्ती होणार असली तरच निषेध संभवतो. **"प्राप्तौ सत्यां निषेधः"**.

**परिशिष्ट भाव**—आसुर मनुष्य अभिमानामुळे स्वत:ला सिद्ध आणि सुखी मानतात—**'सिद्धोऽहं बलवान्सुखी'** (गीता १६।१४), परंतु वास्तविक ते सिद्ध आणि सुखी नसतात—**'न स सिद्धिमवाप्नोति न सुखम्'**. त्यांच्या अंत:करणात अभिमान आणि द्वेषाचा अग्नी जळत राहतो.

***संबंध**—शास्त्रविधीचा त्याग केल्याने मनुष्याला सिद्धी इत्यादींची प्राप्ती होत नाही. म्हणून मनुष्याने काय केले पाहिजे ते पुढील श्लोकात सांगतात.*

## तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
## ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि॥ २४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून | **ज्ञात्वा** | = (—असे) जाणून (तू) | **कर्तुम्** | = करण्यास |
| **ते** | = तुझ्यासाठी | **इह** | = या लोकात | **अर्हसि** | = योग्य आहेस अर्थात् तुला शास्त्रविधीनुसार कर्तव्य-कर्म केले पाहिजे. |
| **कार्याकार्य-व्यवस्थितौ** | = कर्तव्य-अकर्तव्य यांच्या बाबतीत | **शास्त्रविधा-नोक्तम्** | = शास्त्रविधीने नियत | | |
| **शास्त्रम्** | = शास्त्र (च) | **कर्म** | = कर्तव्य-कर्म | | |
| **प्रमाणम्** | = प्रमाण आहे | | | | |

***व्याख्या***— **तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य-व्यवस्थितौ**—ज्यांना आपल्या प्राणांचा मोह असतो, ते प्रवृत्ती आणि निवृत्ती अर्थात् कर्तव्य आणि अकर्तव्य ह्याला जाणत नसल्यामुळे विशेषत: आसुरी-संपत्तीत प्रवृत्त होतात. म्हणून तू कर्तव्य आणि अकर्तव्याचा निर्णय करण्यासाठी शास्त्रालाच प्रमाण मानावे.

ज्यांचा महिमा शास्त्रांनी गायला आहे आणि ज्यांचे आचरण शास्त्रांच्या सिद्धांतानुसार असते, अशा संत-महापुरुषांच्या आचरण आणि वचनानुसार वर्तन करणे हेसुद्धा शास्त्रानुसार आचरण करणेच आहे. कारण त्या महापुरुषांनी शास्त्रांचा आदर केलेला आहे आणि शास्त्रानुसार आचरण केल्यानेच ते श्रेष्ठ पुरुष बनले आहेत. वास्तविक पाहिले तर जे महापुरुष परमात्मतत्त्वाला प्राप्त झाले आहेत, त्यांचे आचरण, आदर्श आणि भाव इत्यादींनीच शास्त्रे बनतात.

**शास्त्रं प्रमाणम्**—याचे तात्पर्य, लोक-परलोकांचा आश्रय घेऊन वागणाऱ्या माणसांसाठी कर्तव्य-अकर्तव्याच्या बाबतीत शास्त्रच प्रमाण आहे.

**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ***—प्राण-पोषणपरायण माणसे शास्त्रविधी (कशात प्रवृत्त व्हायचे व कशातून निवृत्त व्हायचे) जाणत नाहीत (१६।७). म्हणून त्यांना सिद्धी इत्यादींची प्राप्ती होत नाही. भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तू तर दैवी-संपत्तीला प्राप्त आहेस, म्हणून तू

* येथे "इह" पद देण्याचे तात्पर्य, या संसारात मनुष्यशरीर केवळ श्रेष्ठ कर्म करून परमात्म्याला प्राप्त करून घेण्यासाठीच मिळाले आहे. म्हणून ही संधी कधीच वाया घालवू नये.

शास्त्रविधीला जाणून कर्तव्यपालन करण्यास योग्य आहेस.

अर्जुन पूर्वी आपल्या धारणेप्रमाणे म्हणत होते की, युद्ध करण्याने मला पाप लागेल, पण भाग्यशाली श्रेष्ठ क्षत्रियासाठी आपोआप प्राप्त झालेले युद्ध स्वर्गप्रद आहे (२। ३२). भगवान् म्हणतात की, हे सखा! तू पाप-पुण्याचा निर्णय आपल्या मनमानी पद्धतीने करीत आहेस, तू तर ह्या बाबतीत शास्त्रालाच प्रमाण मानले पाहिजे. शास्त्राज्ञा समजूनच तू कर्तव्यकर्म केले पाहिजे. तात्पर्य, ही युद्धरूप क्रिया तुला बंधनकारक नाही, उलट स्वार्थ आणि अभिमान ठेवून केलेल्या शास्त्रीय क्रियाच (यज्ञ, दान इत्यादी) बंधनकारक असतात आणि मनमानी पद्धतीने (शास्त्रविरुद्ध) केलेल्या क्रिया तर पतन करणाऱ्या असतात.

आपोआप प्राप्त झालेली युद्धरूप क्रिया क्रूर आणि हिंसायुक्त दिसत असली तरी ती पापजनक होत नाही (१८।४७). तात्पर्य, स्वभावनियतकर्म करणाऱ्या सर्वथा स्वार्थरहित मनुष्याला पाप लागत नाही, अर्थात् ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या स्वभावानुसार शास्त्रांनी जी आज्ञा दिली आहे, त्यानुसार कर्म केल्याने मनुष्याला पाप लागत नाही. स्वार्थ, अभिमान आणि दुसऱ्यांचे अनिष्ट चिंतन यानेच पाप लागत असते.

मनुष्यजन्माची सार्थकता यातच आहे की, त्याने शरीर, प्राणांच्या मोहात न फसता केवळ परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने शास्त्रविहित कर्मे करावीत.

**परिशिष्ट भाव**—सातव्या श्लोकात भगवंताने म्हटले होते की, आसुर स्वभाव असणारे मनुष्य कर्तव्य-अकर्तव्याला जाणत नाहीत. येथे भगवान् सांगतात की, तो आसुर स्वभाव शास्त्रानुसार आचरण करण्यानेच नाहीसा होईल.

येथे शंका येऊ शकते की, जे शास्त्र शिकलेले नाहीत, त्यांना कर्तव्याचे ज्ञान कसे होईल? याचे समाधान असे आहे की, जर त्यांचा स्वतःच्या कल्याणाचा उद्देश असेल तर आपल्या कर्तव्याचे ज्ञान आपोआप होईल. कारण आवश्यकता अविष्काराची जननी आहे. जर स्वतःच्या कल्याणाचा उद्देश नसेल तर शास्त्र शिकले तरीही कर्तव्याचे ज्ञान होणार नाही, उलट अज्ञान बाढेल की, आम्ही विशेष जाणतो!

***ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसम्पद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः॥ १६॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "दैवासुरसम्पद्विभागयोग" नावाचा सोळावा अध्याय पूर्ण झाला॥ १६॥**

या (सोळाव्या) अध्यायाचे नाव "दैवासुर-सम्पद्विभागयोग" आहे कारण या अध्यायात ज्या दोन्ही संपत्तीचे वर्णन झाले आहे, ते एकमेकाशी बिल्कुल विरुद्ध आहेत अर्थात् दैवी-संपत्ती कल्याण करणारी आहे आणि आसुरी-संपत्ती बंधनकारक आहे तसेच नीच योनीत आणि नरकात नेणारी आहे. जो साधक या दोन्ही विभागांना योग्य रीतीने जाणेल, तो आसुरी-संपत्तीचा संपूर्णपणे त्याग करील. आसुरी-संपत्तीचा संपूर्णपणे त्याग होताच दैवी-संपत्ती आपोआप प्रगट होईल. दैवी-संपत्ती प्रगट होताच एकमात्र परमात्म्याशी संबंध राहील.

## सोळाव्या अध्यायातील पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ षोडशोऽध्यायः**" ची तीन, "**श्रीभगवानुवाच**" ची दोन, श्लोकांची दोनशे सत्त्याऐंशी आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग तीनशे पाच आहे.

(२) या अध्यायामध्ये "**अथ षोडशोऽध्यायः**" ची सात, "**श्रीभगवानुवाच**" ची सात, श्लोकांची सातशे अडुसष्ट आणि पुष्पिकेची बावन्न अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग आठशे चौतीस आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायामध्ये एक उवाच आहे—"श्रीभगवानुवाच"

## सोळाव्या अध्यायातील प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या चोवीस श्लोकांपैकी सहाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात, दहाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात आणि बावीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म विपुला**", तसेच अकराव्या, तेराव्या आणि एकोणीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न विपुला**" संज्ञेचे छन्द आहेत. शेष अठरा श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.